# निवडक प्रकाशने

## कादंबरी

क्रांति ५-००
सानें गुरुजी

क्रांति (संक्षिप्त) २-००
साने गुरुजी

तीन मुले ३-५०
साने गुरुजी

## चरित्र

ईश्वरचंद्र विद्यासागर ३-००
साने गुरुजी

इतिहासाचार्य राजवाडे २-००
साने गुरुजी

श्रीरामकृष्ण परमहंस २-००
त्र्यं. ग. बापट

स्वामी विवेकानंद २-५०
त्र्यं. ग. बापट

साने गुरुजी १-५०
त्र्यं. ग. बापट

## प्राचीन साहित्य

स्त्रीजीवन ३-५०
साने गुरुजी

हरिवरदा खंड १ ते ८
कृष्ण दयार्णव ६५-००

## महाविद्यालयीन

सुलभ राज्यशास्त्र ६-००
स. मा. गर्गे

# विचारप्रवर्तक निबंध

| | |
|---|---|
| राष्ट्रीय हिंदूधर्म<br>साने गुरुजी | २–५० |
| समाजधर्म<br>साने गुरुजी | १–७५ |
| संत आणि समाज<br>काका कारखानीस | ५–०० |
| समर्थ रामदास<br>काका कारखानीस | ५–०० |

# बाल वाङ्मय

| | |
|---|---|
| गोखल्यांच्या गोष्टी<br>पु. पां. गोखले | ०–६० |
| असे आपलें आगरकर<br>पु. पां. गोखले | ०–६० |
| तळ्यातलें रहस्य<br>सौ. सुशीला चिकटे | २–०० |
| गोष्टीरूप बिरबल<br>त्र्यं. ग. बापट | ०–८० |
| सुंदर कथा<br>साने गुरुजी | ०–५० |
| मुलांसाठी फुलें<br>साने गुरुजी | ०–४० |
| इसाप कथा<br>त्र्यं. ग. बापट | १–५० |
| चिगू नि टिगू<br>सुधाकर पवार | ०–५० |
| लाल लाल माणिक<br>विद्याधर | ०–५० |
| राक्षसाचे कोडे<br>अच्युत शिरवाडकर | २–०० |
| बादशहाचे बक्षीस<br>अच्युत शिरवाडकर | ०–५० |



१

# इसापची माता

फार जुनी गोष्ट आहे. पश्चिम समुद्राजवळ एक गाव होते. त्या गावात दोनशे घरे होती. त्यापैकी एका घरात एक मध्यम वयाचा शेतकरी राहात होता. त्याची बायको अतिशय कुरूप होती. त्यामुळे भोवतालचे लोक तिच्याकडे तिरस्काराने पाहात. तिला बरेच दिवस मूल झाले नव्हते. नेहमी ती देवाला प्रार्थना करी की, " देवा, मला राजहंसासारखा चतुर असा एक मुलगा दे."

पुढे काही दिवसांनी ती माता होणार, अशी चिन्हे दिसू लागली. ती अशिक्षित कुरूप बाई पशू, पक्षी आणि कीटक यांची प्रार्थना करी. राजहंस, हत्ती, सिंह व नाग यांची स्तुती करी आणि त्यांना म्हणे की " तुमच्यामधील सद्गुण माझ्या मुलात येवोत."

पण एक दिवस भयंकर प्रसंग त्या गावावर आला. बंदरावर काही चाचे उतरले. त्यांनी त्या गावावर हल्ला केला; आरंभी दिसेल त्याला ठार मारले. लोक भयभीत झाले. मग त्यांनी सगळ्या वाटा रोखून धरल्या, आणि दवंडी पिटली, " प्रत्येकाने आपल्या घरातील सोने, चांदी, धान्य, कपडे, व भांडी चौकात आणून ठेवावीत. जो लपवून ठेवील त्याचे पाय कुऱ्हाडीने तोडले जातील."

घाबरलेल्या गावकऱ्यांनी आपापली घरे धुऊन सगळे सामान चौकात आणून त्याचा ढीग केला. त्या चाचे लोकांच्या नायकाने त्यांच्या त्या लुटीचे दोनशे विभाग केले आणि प्रत्येक शेतकऱ्याच्या डोक्यावर प्रचंड ओझे ठेवले. प्रत्येकाच्या पायात बेड्या ठोकल्या. एकंदर माणसांचे तीन भाग केले. पुरुष, स्त्रिया आणि मुले; स्त्रियांना दोऱ्यांनी बांधले. त्यात सुंदर स्त्रिया आणि कुरूप स्त्रिया असे दोन भाग केले; व अशक्त मुलांची कत्तल केली. नंतर त्या समुद्रातील चोरांनी ते खेडे पेटवून दिले. आगीचे लोळ वर गेले. मग त्यांनी ती निर्जीव लूट आणि सजीव लूट बरोबर घेतली. त्या कैद्यांना फटके मारीत बंदराकडे नेले व तीन जहाजावर चढविले. त्यात तो शेतकरी आणि त्याची कुरूप बायको यांची ताटातूट झाली. ती गर्भवती होती तरी तिला जहाजातील तळाशी स्वयंपाक करण्याचे काम दिले. ती मनात म्हणाली, " देवा, आता आम्हाला गुलामांच्या बाजारात विकणार. माझा मुलगा गुलाम म्हणून जन्माला येणार ! त्याची कधी तरी सुटका होईल का ? "

दोन महिन्यांनी ती जहाजे बंदराला लागली. त्या शेतकऱ्याला एका जहाजावर इतका त्रास झाला की उतरल्याबरोबर उलटया होऊन तो मरण पावला. स्त्रियांना अथेन्स शहरी नेले. मुलांना राजांचे हुजरे म्हणून काम सांगितले. स्त्रियांना गावभर फिरविले व शेवटी गुलामाच्या बाजारात आणले. त्यांचा गुराप्रमाणे लिलाव सुरू झाला. त्या शेतकऱ्याच्या गर्भवती पत्नीची पाळी आली. तिला कोणीच विकत घेईना. गुलामांचे व्यापारी तिला काठीने ढोसून निघून गेले. तिला वाटले, आपली विक्री झाली नाही त

हे चावे लोक आपल्याला ठार करतील. पकडल्यापासून तिने भाषण बंद केले होते. कोण केव्हा कसली चुगली करील आणि आपल्या पाठीवर फटके बसतील याचा नेम नाही असे तिला वाटे.

इतक्यात तिकडून एक दाढीमिशा वाढलेला तत्त्वज्ञानी आला. त्याचे नाव झांथस. त्याला स्वयंपाकघरात काम करण्याकरता एक बाई पाहिजे होती. त्याने तिला विकत घेतले व तिचे 'ॲनी' असे नाव ठेवले. घरी गेल्यावर तिने झांथसच्या घरी अनेक प्रकारचे काबाडकष्ट केले; पण तिने तोंडातून कधीही शब्द काढला नाही. पुढे दोन महिन्यांनी ती प्रसूत झाली. तिला मुलगा झाला. तोही तिच्यासारखाच कुरूप होता. झांथसने त्याचे 'इसाप' असे नाव ठेवले.

इसाप ॲनीजवळ स्वयंपाकघरात वाढत होता. झांथसच्या घरी चाललेल्या तत्त्वज्ञानाच्या गप्पा तो लक्षपूर्वक ऐके; पण ॲनी त्याच्याशी कधीही स्पष्ट बोलत नसे. कोणी झांथसजवळ चहाडी करील आणि आपल्याला व इसापला मार बसेल असे तिला वाटे. म्हणून ती नेहमी त्याच्याशीं गोष्टीरूपाने बोले. एकदा चार वर्षांचा इसाप झोपीं जाईना. रात्र तर झाली होती. तेव्हा ॲनी म्हणाली. एक होती चिमणी. एक होते तिचे पोर. चिमणी म्हणाली, "बाळ रात्र झाली, तू झोपी जा." गोष्ट चालू असतानाच इसापला झोप लागली. याप्रमाणे इसाप सात वर्षांचा झाला. एक दिवस झांथसकडे मोठी पंगत होती. जेवणास उशीर होता. इसाप भूक लागली म्हणून रडू लागला. ॲनी गोष्ट सांगू लागली. "एक होता सिंह. एक होती मैना. मैना सिंहाच्या घरी स्वयंपाक करी. तिला होते एक बाळ.

एक दिवस सिंहाने राजहंसाना जेवावयाला बोलावले. बाळ म्हणाले, 'मैना, मी राजहंसाच्या पंगतीला बसणार.' 'मैना म्हणाली, 'बाळ शहाणा आहे. मागच्या पडवीत



शिळे अन्न ठेवले आहे. तो आनंदाने ते खातो." .... गोष्ट एकताच इसाप उमजला व पडवीतील शिळ्या अन्नावर त्याने आपली भूक भागविली. एके दिवशी रात्रीच्या वेळी इसाप जागा झाला. त्याचा धनी झांथस त्याला भांडी विसळण्याचे काम देत असे. इसाप अतिरिक्त कष्टाने किचा-ळून उठला. आता काय करावे ? ॲनीला चिंता पडली. धन्याची झोपमोड झाली तर आपणा दोघांनाही मार बसेल ती गोष्ट सांगू लागली. एका घरात काही उंदीर राहात होते. एका रात्री एक उंदीर जागा झाला. खडबड खडबड करू लागला. त्याची आई म्हणाली, 'उंदरा, उंदरा, तो

पहा बोका.' असे सांगताच तो उंदीर गप्प बसला आणि इसापही स्वस्थ झोपी गेला.

इसाप दहा वर्षांचा झाल्यावर ॲनी मरण पावली. पण तिची गोष्टीरूपाने बोलण्याची पद्धती मरण पावली नाही. ती पद्धती इसापने आत्मसात् केली; आणि तोही आयुष्यभर गोष्टीरूपाने बोलत राहिला.

• • •

२

# जिलब्या आणि चकल्या

"इसाप!"

"जी धनीसाहेब."

"उद्या आपल्या घरी या शहरातील मोठे लोक चर्चा करण्याकरिता येणार आहेत. त्यांच्याकरिता उत्तम पक्वान्न तयार कर."

"पण धनीसाहेब, खर्च किती करू?"

"तुला वाटेल तितका. काटकसर नको. पण लक्षात ठेव. पक्वान्न मिठ्ठास झाले पाहिजे. लोकांनी स्तुती केली पाहिजे. लोक जर नाखूष झाले तर उलटा टांगीन आणि तुझ्या उघड्या पाठीवर मिठाच्या पाण्यात बुडविलेल्या चाबकाने शंभर फटके मारीन. समजले का?"

"होय धनीसाहेब."

अथेन्स नावाच्या शहरात अडीच हजार वर्षांपूर्वी वरील संभाषण एका भव्य प्रासादात चालले होते. त्या प्रासा-

दाऱ्या मालकाचे नाव झांथस. हा मोठा तत्त्वज्ञानी असून विद्वानांचा चाहता होता. त्याच्या घरी नेहमी सभा भरत. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणे त्याने अनेक गुलाम खरेदी केले होते. त्यापैकी एका गुलाम स्त्रीच्या मुलाचे नाव इसाप होते. इसापची स्वयंपाकघरात नेमणूक झाली होती. अनेक सणांच्या वेळी मेजवान्यांचा स्वयंपाक त्याने केला व आपल्या विद्वान परंतु तापट अशा धन्याची मर्जी सांभाळली. पण आज प्रसंग निराळा होता. आज इसापच्या पाककौशल्याची परीक्षा होती.

इसाप विचार करीत होता. त्याच्या पायातील जड लोखंडी बेड्या त्याला त्रास देत होत्या. त्याचा पोषाख कैद्यासारखा होता. पायाला चिरा पडलेल्या होत्या. पोटऱ्यावर बेड्यांचे घट्टे दिसत होते. दाढी-मिशा वाढल्या होत्या. त्याचे नाक चपटे, डोळे बटबटीत व गालावर देवीचे वण असे त्याचे बेढब शरीर होते. म्हणून त्याची योजना स्वयंपाकघरावर केली होती.

गरीब बिचारा कुरूप दिसणारा इसाप विचार करीत होता. ' आज काय पक्वान्न करावे ? कोणते पदार्थ विकत आणावेत ? कोणत्या बाजारात जावे ? कोणत्या पदार्थांचे मिश्रण रसदार होईल ? '

इसापने मनात काही विचार नक्की ठरविला. धन्याने दिलेले पैसे घेतले व एक पातेले डोक्यावर घेऊन आपल्या जड बेड्यासहित तो रानात पारध्याकडे गेला. पारधी म्हणाला, " काय रे गुलाम काय पाहिजे ? "

" मला टिटवी, सारस, मोर, कबूतर, काकाकुवा, भारद्वाज, चंडोल, मैना, घुबड, गिधाड, आणि गरुड या पक्ष्यांच्या जिभा पाहिजेत. "

"तुला वेड तर लागले नाही ? नुसत्या जिभा घेऊन तू काय करणार ?" पारधी म्हणाला.

"पारधीदादा, मला असतील तितक्या पक्ष्यांच्या जिभा द्या. वाटेल तितके पैसे घ्या."

पारध्याने पाच शेर जिभा चौपट किमतीला विकत दिल्या. त्या जिभा एका पातेल्यात घालून इसाप झपझप पावले टाकीत वाण्याच्या दुकानी गेला. तेथे त्याने रवा, तूप साखर इत्यादि पदार्थ भरपूर विकत घेतले आणि तो धन्याच्या राजवाड्याकडे परत फिरला. रात्रभर तो स्वयं-पाकाच्या तयारीत होता. मदतीला कोणी नाही. चुकले तर उघड्या पाठीवर मिठाच्या पाण्यात बुडविलेले फटके बस-ण्याची भीति.

सकाळ झाली. दहा वाजले तसे हळहळू पाहुणे येऊ लागले. स्वयंपाकघरातून पक्वान्नांचा स्वादिष्ट असा वास येत होता. चार घोड्यांचे रथ दाराशी उभे राहू लागले. व्यापारी, संपादक, कारखानदार, तत्त्वज्ञानी, ठेकेदार, कवी सेनापती, मुत्सद्दी, वक्ते, लेखक, अध्यापक, दिग्दर्शक, दिवाण असे अनेक धंद्यांचे व अनेक पक्षांचे लोक त्या ठिकाणी एका भव्य सभागृहात जमा झाले. सभा सुरू झाली. 'ईश्वराचा मोठेपणा' हा विषय नेमला होता. सर्वांची भाषणे झाली. शेवटी अध्यक्षस्थानी असलेला झांथस म्हणाला, "सभा समाप्त झाली. आता सर्वांनी भोजनास चलावे."

सुमारे साठ लोक भोजनास बसले. तेथील व्यवस्था रेखीव होती. अत्तरांचे फवारे पानाभोवती उडविले होते. गुलामगिरीच्या अस्तित्वामुळे त्यावेळी धनिकांचे वैभव उतू चालले होते.

भोजनाचे मुख्य पक्वान्न घेऊन इसाप एक पातेले घेऊन पुढे आला. त्यात जिलब्या ठेवल्या होत्या. सर्वांनी मनापासून खाल्ल्या. पण नेहमीपेक्षा चव थोडी निराळी लागत होती. म्हणून एकाने विचारले, " काय इसाप, जिलब्या कशाच्या केलेल्या आहेत ? "

" रवा भिजवून त्यात वाटलेल्या जिभा टाकल्या आहेत. मग ते पीठ रात्रभर तसेच ठेवले व आज सकाळी या जिभांच्या जिलब्या तुपात तळल्या. " इसाप म्हणाला.

सर्वांना जिलब्या आवडल्या; पण रव्यामध्ये वाटलेल्या जिभा मिसळल्या आहेत हे कोणासही सांगता येईना.

मेजवानी संपल्यावर झांथस म्हणाला. " इसाप, उद्या अशीच सभा आहे. त्या सभेनंतर पुनः मेजवानी आहे. त्या वेळी रुचिपालट म्हणून निराळे पक्वान्न कर. ते आजच्यापेक्षा चविष्ट असले पाहिजे. पदार्थ वाईट झाला तर खुंटीवर लटकणाऱ्या हरणाच्या चाबकाची मेजवानी तुझ्या हाडकुळ्या पाठीला मिळेल. "

" जी धनीसाहेब. " इसाप उत्तरला.

इसापचे शरीर माराच्या भीतीने थरथर कापत होते. त्याने मनात काही विचार केला व पारध्याकडे जाऊन पुन्हा जिभा मागितल्या. पारध्याने हा कोणी वेडापीर आहे असे समजून पाच शेर जिभा तोलून दिल्या. पण या वेळी इसापने ज्या जिभा निवडल्या त्या चित्ता, साप, मुंगूस, वाघ, सिंह, लांडगा इत्यादि क्रूर प्राण्यांच्या होत्या.

इसाप घरी आला. डाळीच्या पिठात त्याने वाटलेल्या जिभा मिसळल्या. पीठ कालवले. तिखटमीठ घातले व तो झोपी गेला. रात्री त्याला स्वप्न पडले. त्या स्वप्नात हर-

णाचा चाबूक आपल्या पाठीवर कडाड् कडाड वाजत आहे असा त्याला भास झाला व तो दचकून ओरडत जागा झाला. पहाट झाली होती. त्यानें चुलाणा पेटवला. पिठात आणखी लालभडक तिखट मिसळले. मोठी कढई ठेवली. डबाभर गोडे तेल तीत ओतले. बेडचा मागे सारल्या आणि सोऱ्या घेऊन चकल्या करण्यास सुरवात केली. मदतीला कोणीही नव्हते. त्याचे वागणे इतर गुलामांच्यापेक्षा व्यवस्थित आणि प्रामाणिक असल्यामुळे कोणीही त्याच्या मदतीला येत नसे. इतर गुलाम पक्कान्न तयार होत असताना मधून मधून बोकाणा भरीत. पण इसापने कधीही चोरून खाल्ले नाही. मेजवानी संपल्यावर धनी देईल त्या पदार्थावर तो संतुष्ट असे.

दहा वाजले. स्वयपाकघरातून खमंग वास येत होता. पाहुणे जमू लागले. सभा भरली. आजचा विषय राजकारणातील पक्ष, हा होता. सुरुवातीपासून चर्चा चुरचुरीत होत चालली. हुंशा, टाळचा, 'पुरे' असे आवाज निघू लागले. पुढील वक्ते वर्दळीवर आले. पुस्तके उचलून त्यांनी एकमेकांच्या डोक्यात मारली; सभेत गोंधळ उडाला; सभा उधळली.

तेव्हा झांथस म्हणाला, "सभासद मित्रांनो! चर्चा पुरे. मेजवानीस चला."

पाने मांडली. सर्व भोजनास सिद्ध झाले. चकल्यांचे टोपले घेऊन इसाप पुढे आला. त्याने एकेका पानावर चार चार चकल्या वाढल्या. वादग्रस्त सभासद चकल्या खाऊ लागले. चकल्या अतिशय तिखट झाल्या होत्या. सर्वांच्या डोळ्यातून पाणी आले. ते संतापले. एकजण म्हणाला, "या इसापला फाशी द्या." दुसरा म्हणाला, "त्याला तेलाच्या कढईत टाकून द्या."

झांथस रागाने आणि चकल्यातील तिखटामुळे लाल झाला होता. त्याने खुंटीवरचा चाबूक घेतला. सर्व विद्वान् सभासद इसापला झोडपण्याकरता कडे करून उभे राहिले.

"इसाप !" झांथसने हवेत चाबूक वाजवला.

"जी, सरकार."

"या चकल्या कशाकरता केल्यास ? त्यात इतके तिखट कशाकरता घातलेस ? त्यात पशूंच्या जिभांचे तुकडे का मिसळलेस ? कालही जिलब्यांमध्ये पक्ष्यांच्या जिभा का घातल्यास ?"

"धनीसाहेब, ऐकून घ्या; सर्व सांगतो."

"लवकर सांग नाही तर या आसुडाने तुझ्या खप्पड पाठीच्या चकल्या करून टाकतो."

"धनी सरकार ! थोर थोर कलावंतांनो, या नगरातील थोर गृहस्थांनो, जरा ऐका. माझे म्हणणे पटले तर मला सोडा; नाही तर मला फाशी द्या.

"काल पक्ष्यांच्या जिभांच्या जिलब्या केल्या. पक्षी आकाशात उंच विहार करतात. काल तुम्ही कल्पनेच्या पंखावर उंच गेलात. ईश्वराचे मोठेपण कसे असते याची चर्चा केलीत. तुमच्यात भांडण झाले नाही. ईश्वराची प्रार्थना भक्त आपल्या जिभांनी करतात. त्या प्रार्थनेत गोडवा असतो. म्हणून काल जिभांच्या जिलब्या केल्या. जिभा जर गोड बोलतील तर संसार सुखाचे होतील."

सभासद थोडे शांत होत चालले. झांथसच्या हातातील चाबूक खाली आला. तो कुतूहलाने म्हणाला, "पण महामूर्खा, तू या तिखट चकल्या कशाकरिता केल्यास ? वाघसिंहाच्या जिभा कोणी खातात का ?"

" धनीसाहेब, जरा ऐकून घ्या आज सभेत भांडण का झाले ? जिभांच्यामुळे. राष्ट्रात युद्धे का होतात ? न्यायालयात गर्दी का होते ? रस्त्यात हमरीतुमरीवर लोक का येतात ? भाऊ भाऊ का भांडतात ? जावा जावा एकमेकींच्या झिंज्या का उपटतात ? हा सर्व जिभेच्या तिखटपणा आहे; म्हणून मी आज मारामारी करणाऱ्या पशूंच्या जिभा या चकल्यात मिसळल्या. "

"शाबास, इसाप, शाबास ! " तत्त्वज्ञानी झांथस म्हणाला.

"याला गुलामगिरीतून मुक्त करा." एक सभासद म्हणाला.

" हा फार चतुर दिसतो. याला गोष्टी सांगता येतात." तिसरा म्हणाला.

इसापच्या पायातील बेडचा झांथसने काढून टाकल्या. त्याला पोशाख दिला, भरपूर जेवण दिले.



• • •

३

# मिठाचे पाणी

" इसाप लवकर ये " झांथसने हाक मारली, 'जी साहेब' असे म्हणून इसाप पुढे आला. त्याचा धनी झांथस पुढे म्हणाला. " इसाप, मी राजाच्या बागेतून हे सहा उत्कृष्ट पेरू आणले आहेत. हे इथे कोनाड्यात ठेवतो. या दिवसात असे पेरू मिळत नाहीत. मी संध्याकाळी सूर्यदेवाच्या मंदिरात जाणार आहे. त्यावेळी हे पेरू देवाला अर्पण करीन. मी आता स्नान करून येतो. पेरूंवर लक्ष ठेव. हा दिवाणखाना झाडून काढ. केर बाहेर टाकून ये; मोठी सतरंजी अंथर; तोपर्यंत, मी आंघोळ करून येतो. "

झांथस आंघोळ करण्याकरिता स्नानगृहात गेला. झांथस हा महान तत्त्वज्ञानी होता. राजाची त्याच्यावर बहाल मर्जी होती. पण दुर्दैवाने त्याचा संसार सुखाचा नव्हता. त्याची पत्नी जेसिका ही एक कर्कशा होती. आणि मुलगा रॉकेलस हा उधळ्या आणि खुशालचेंडू होता. काही वेळाने मुलगा तेथे आला. त्याच्याबरोबर नोकर म्हणून तीन गुलाम होते. ते सर्व इसापचा द्वेष करीत. ते तिरस्काराने इसापाकडे पाहू लागले; कारण झांथसचे इसापवर प्रेम होत. इसापने खोली झाडली. चिरंजीव रॉकेलस शीळ वाजवीत इकडे तिकडे पहात होते. त्यांचे लक्ष पेरूवर स्थिरावले. त्यांच्या तोंडाला पाणी सुटले आणि मेंदूमधून भयंकर विचार सुटू लागले. त्यांनी आपल्या गुलामांना नेत्रसंकेत केला. गुलामांनी पेरू-

कडे पाहिले आणि इसापकडे पाहिले. इसापचे पोट खपाटी गेले होते.

इसापने केर एका टोपलीत भरला सतरंजी आंथरली. जीभ ओठावर फिरवली. पण खायला कोण देणार ! धन्याची कजाग बायको दोन वाजता त्याच्यापुढे शिळे तुकडे टाकत होती. इसापने त्या केराच्या टोपलीकडे पाहिले. तो मनात म्हणाला, " हा केर येथे पाहिला तर धनी माझ्यावर रागावतील. " असे म्हणून त्याने ती केराची टोपली घेतली आणि केर टाकण्यासाठी म्हणून तो बागेत निघून गेला. इकडे रॉकेलस पुढे सरसावला. त्याने ते पेरू बाहेर काढले. एक एक पेरू गुलामांना दिला आणि बाकीचे आपण खाल्ले. नंतर तो घरात गेला आणि त्याने आईला सांगितले की, इसापने पेरू खाल्ले ! हे ऐकल्याबरोबर ती कजाग जेसिका संतापली. तिनें घोड्याचा चाबूक हातात घेतला आणि ती दिवाणखान्यात आली. इतक्यात इसाप केराची मोकळी टोपली घेऊन आत आला. त्याने वाकून बाईसाहेबांना मुजरा केला तोच त्याच्या पाठीवर फडाड् असा चाबकाचा फटकारा ऐकू आला. याचवेळी स्नागृहातून झांथस बाहेर आला. त्याने विचारले, " अग हे काय चाललें आहे ? त्या बिचाऱ्याला का फटके मारतेस ! " हे ऐकून ती कर्कशा म्हणाली, " अहो हा इसाप म्हणजे साप आहे. कितीही खायला घातले तरी हा गरळच ओकणार. तुम्ही नैवेद्य दाखविण्याकरिता पेरू आणलेत ते सगळे याने खाऊन टाकले; राक्षसासारखा खादाड आहे मेला. याला गुलामांच्या बाजारात उभा करा आणि विकून टाका. चांगली किंमत येईल. " हे ऐकून झांथस म्हणाला, " इसापनेच पेरू कशावरून खाल्लें ? मला नाही

खरं वाटत. तो बिचारा थरथर कापतो आहे, त्याचे डोळे पाहा एखाद्या कोकरासारखे गरीब दिसतात. दुसऱ्या कोणी कशावरून घेतले नसतील ? '' हे बोलताना झांथसने श्रीमंत सकलगुणालंकृत अशा आपल्या चिरंजीवाकडे पाहिले. हे ऐकून आई म्हणाली '' म्हणजे तुम्हाला माझ्या मुलाचा संशय येतो वाटतं. उद्या माझा सुद्धा येईल. परवा चुकून



त्याने कुठे तुमच्या खिशातले पैसे घेतले आणि तो दारू प्यायला तर काय गहजब केला तुम्ही ! आता या वेळी इसापला तुम्ही स्वत: १० फटके मारा म्हणजे तो कबूल होईल. माझा मुलगा सकाळपासून भुकेलेला आहे. बाळ अगदी सुकून गेला आहे ! ''

हा सर्व देखावा पाहून झांथसला काही उमज पडेना. त्याने चाबूक हातात घेतला आणि तो म्हणाला, " इसाप तूच पेरू खाल्लेस असे मला वाटते; कारण तू काहीच बोलत नाहीस." इतक्यात झांथसची बायको म्हणाली, " अहो खाली मुंडी आणि पाताळ धुंडी." तेव्हा झांथस कोपरापासून हात जोडून म्हणाला " माझे आई, तू आता जरा गप्प बसशील का ? " झांथस रागावला हे पाहून सर्व लोक गप्प बसले. झांथस म्हणाला, " इसाप आज क्षमा होणार नाही. जेवणापूर्वी काय तो उलगडा झाला पाहिजे. बोल पेरू कोणी खाल्ले ? तुला येथे पेरूंची राखण करण्यासाठी ठेवले होते. " हे ऐकून इसाप म्हणाला, " धनीसाहेब जरा थांबा. मी माझे निरपराधित्व सिद्ध करतो. कृपा करून मी सांगेन तसे मात्र करा. आणि मी मग अपराधी ठरलो तर मला १०० फटके मारा. आणि निरपराधी ठरलो तर तुमच्यासारख्या तत्त्वज्ञानी माणसाचा मला आश्रय द्या ! "

यानंतर इसाप अंगणात गेला व त्याने बादलीभर पाणी आणले. नंतर तो स्वयंपाकघरात गेला आणि त्याने एक तांब्याभर मीठ आणले. ते मीठ त्या बादलीत टाकले. ते मीठ पाण्यात पूर्ण विरघळल्यानंतर इसाप म्हणाला, 'धनीसाहेब, एक तांब्याभर पाणी मी पितो. तसेच कृपा करून सर्वांना एक एक तांब्या पाणी पिण्यास सांगा." इसापने तांब्याभर मिठाचे पाणी पिऊन टाकले. झांथसने आपल्या मुलाला आणि त्या तीन गुलामांना एक एक तांब्या पाणी पिण्यास भाग पाडले. यानंतर इसाप म्हणाला, " आपण सर्वांनी अंगणात उभे राहू या. " काही वेळाने इसापला ओकारी आली तो भडभडा ओकला. झांथस म्हणाला, "कायरे गाढवा ! हा काय पोरखेळ चाललाय. "

पण इकडे झांथसचा मुलगा घाबरला होता. आणि आईच्या लक्षात त्याचा पोरखेळ आला होता. इसाप म्हणाला "धनी-



साहेब मी जे ओकलो त्यात एक तरी पेरूचा कण आला आहे का ते पहा." इतक्यात बाकीचे तीन गुलाम व झांथसचा मुलगा हे ओकू लागले आणि पेरूचे तुकडे पडू लागले. विशेषतः चिरंजीवाच्या तोंडातून पेरूचे अनेक तुकडे बाहेर आले हे पाहून झांथसने चाबूक फेकून दिला. आपल्या कपाळाला हात लावला. सूर्यदेवाला त्याने नमस्कार केला आणि इसापला म्हणाला, "तुझ्या चातुर्यावर मी प्रसन्न झालो आहे. तू स्वयंपाकघरात चल, आज माझ्याबरोबर तुला भरपूर सुग्रास जेवण देतो!"

• • •

# ४

# झांथसचे दुसरे लग्न

पेरूचे प्रकरण संपल्यावर झांथसची बायको जेसिका ही अधिक आदळआपट करू लागली. झांथस बिचारा एकपत्नी-व्रती आणि संयमी असा पती होता. नाहीतर त्या काळात मालक चार लग्ने करी आणि गुलामातील चार स्त्रिया दासी म्हणून राहात. झांथस सात्विक प्रवृत्तीचा होता. तो एक दिवस सकाळी बागेत बसला होता. दहा विद्यार्थी भोवती बसले होते. आणि त्यांना तो ईश्वराचे अस्तित्व या विषयावर व्याख्यान देत होता. आकाशात ढग जमले होते थोडासा गडगडाटही सुरू झाला होता. गरीब बिचारा इसाप बाग झाडण्याचे निमित्त करून ते व्याख्यान ऐकत होता. त्या दहा विद्यार्थ्यांबरोबर त्याला जर परीक्षेला बसविले असते तर तोच पहिला आला असता. इसाप ईश्वराच्या अस्तित्वावरचे ते व्याख्यान जिवाचे कान करून ऐकत होता. झांथस म्हणाला. "मुलांनो तुम्ही प्रश्न विचारलात की ईश्वर कुठे आहे. मी तुम्हाला असा प्रश्न विचारीन की ईश्वर कुठे नाही ? तो परमात्मा जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी सर्वत्र आहे."

भाषण ओघात आले असताना झांथसची पत्नी भांडी विसळलेले पाणी घेऊन आली आणि म्हणाली, "अहो तुमचा परमेश्वर आज भाजीच्या दुकानात बसलेला आहे. बाजा-



रात जा आणि बटाटे घेऊन या. भुकेचे अस्तित्व बारा वाजता सिद्ध होते."

झांथस म्हणाला, "माझा एवढा धडा संपवू दे." पत्नी म्हणाली, "काय हो हे विद्यार्थी तुम्हाला माझ्यापेक्षा जास्ती वाटतात ना? तुम्हांला माझ्याबद्दल काहीच वाटत नाही का?"

झांथस म्हणाला, " असे कसे होईल, मला तुझ्याविषयी पुष्कळ वाटते; मला असे वाटते की, सूर्यदेव जेव्हा अक्कल वाटत होता त्यावेळी बटाटे आणण्यासाठी तू बाजारात गेली होतीस ! " हे ऐकून ती संतापली आणि तिने ते विसळलेल्या भांड्याचे पाणी झांथसच्या डोक्यावर घातले. तरीसुद्धा झांथस सागरासारखा शांत होता. आणि तो म्हणाला, " मुलांनो या बादलीतल्या पाण्यातही तोच परमेश्वर आहे. वाघ आणि कोकरू यामध्येही तोच परमेश्वर आहे, " झांथसची ही शांतता पाहून पत्नी अधिकच भडकली आणि म्हणाली, " मी आता माहेरी जाऊन राहते आणि सहा महिने परत येणार नाही, घरातील सगळे धान्य घेऊन जाते. तुम्ही देवाच्या अस्तित्वाचे लाडू खात बसा. आणि तुमच्या व्याख्यानाचे पाणी पीत बसा. तुमच्या विनोदाचा रस भरपूर चाखा. तुमचे पोट भरेल. " असे म्हणून ती कर्कशा सर्व धान्य घेऊन माहेरी गेली. तेव्हा झांथसने हसून आपल्या ओल्या झालेल्या कपड्याकडे पाहिले. विद्यार्थ्यांकडे पाहिले आणि तो म्हणाला, " काय रे मुलांनो तुम्ही किंवा इसाप या प्रसंगाला साजेल असे काही उत्तर द्याल काय ? " सर्व विद्यार्थी भीतीने चूपचाप बसले होते. तेव्हा इसाप म्हणाला, " धनीसाहेब मला क्षमा करा. पण तुमच्या प्रश्नाचे उत्तर देतोच. मला असे वाटते की, आकाशात गडगडाट झाल्यावर बादलीभर पाण्याचा पाऊस पडला ! "

त्या दिवशी झांथसला सुग्रास जेवण मिळाले नाही. बायको माहेरी गेली; आता काय करावे, तिचे वेड कसे घालवावे, अशा विवंचनेत तो पडला. शेवटी त्याने काकुळतीने इसापकडे पाहिले व तो म्हणाला, " इसाप आता तुझी मालकीण

कशी परत येईल रे ? ती कजाग असली तरी प्रेमळ आहे. हा मुलगा तिला छळत असतो. आता काय करू मी." तेव्हा इसाप म्हणाला, "धनीसाहेब सांगू मी ? आता दुसरं लग्न करा." ते ऐकून झांथस म्हणाला, "गाढवा तुला काही लाज वाटते का ? मी प्राण गेला तरी मी दुसरे लग्न करणार नाही; ती कशीही वागली तरी दुसरे लग्न करणार नाही. पण ती घरी कशी परत येईल याची युक्ती सांग." इसाप म्हणाला, "धनीसाहेब युक्ति सांगतो. ऐका- आपण दुसरे लग्न करू नका. पण आपला भरजरी पोशाख काढा. अं हं ! काही बोलू नका. मुकाटचाने पोशाख घाला. आणि संध्याकाळच्या आत बाईसाहेब परत आल्या नाहीत तर मला शंभर फटके मारा." नंतर इसाप बाजारात गेला. आणि फुलवाल्याला म्हणाला, "पाच हजार गुच्छ आताच्या आता धनीसाहेबांचेकडे पाठवून दे. !" फुलवाला म्हणाला, "अरे काय झांथसच्या मुलाचे लग्नबिग्न आहे काय ?" इसाप म्हणाला, "अहो, फुलवाले ! प्रत्यक्ष धनीसाहेबांचे दुसरे लग्न आहे. ताबडतोब फुले पाठवा–" नंतर इसाप बँड-वाल्याकडे गेला आणि मालकाला म्हणाला, "शंभर लोकांचा ताफा आणि दहा शिंगाडे घेऊन आताच्या आता वाजतगाजत चला. पहिल्या मालकीणबाईंच्या घरावरून वाजतगाजत चला. दारासमोर बॅण्ड वाजवीत उभे राहा. आज धनीसाहेबांचे दुसरे लग्न आहे." नंतर तो कापड दुकानात गेला आणि त्याने बस्ता बांधण्यास सांगितला. आणि मग तो गेला सराफकटचावर. तो म्हणाला, 'हिऱ्या-मोत्यांचे दागिने लवकर तयार करा आणि झांथसकडे पाठवा." या गडबडीमुळे सगळचा गावात बातमी पसरली

की, ज्याला आपण एकपत्नीव्रती आणि तत्त्वज्ञानी असे समजत होतो तो झांथस दुसरे लग्न करीत आहे. तो त्या दुकानातून बाहेर पडला. इतक्यात झांथसची बायको ही वार्ता समजल्यामुळे रस्त्यातून धावत येताना दिसली. तिने इसापला पकडले आणि ती म्हणाली, "कुठे चाललास?" इसाप म्हणाला, "मी लग्नाकरिता भटजी बोलवावयास जात आहे." हे ऐकताच ती वेड्यासारखी धावत धावत घरी गेली. तिने दिवाणखान्यात प्रवेश केला आणि तिला काय दिसले? झांथसच्या गळ्यात अनेक हार होते आणि त्याने नवरदेवाचा पोशाख केला होता. ती समोर गेली आणि झांथसच्या पाया पडून म्हणाली, "महाराज, या लबाड गुलामाच्या नादी लागून तुम्ही दुसरे लग्न करणार? कोण दुसरी हडळ आहे ती घरात तर येऊ दे. तिच्या झिंज्याच उपटून टाकते. कोणाची मुलगी आहे ते सांगा." "मुहूर्ताला अजून अगदी थोडा अवकाश आहे," असे इसाप म्हणाला. झांथस म्हणाला, "तू कितीही रागावलीस तरी तूच माझी आवडती पत्नी आहेस. पण मी दुसरे लग्नही करणार आहे. तत्त्व–जिज्ञासा या नावाच्या म्हाताऱ्या मुलीशी माझे दुसरे लग्न होणार आहे. इसापची युक्ति आता माझ्या लक्षात आली."

• • •

५

# घोडा आणि गाढव यांची गोष्ट

झांथस हा आपली प्रचंड बाग पहात हिंडत होता. तो विहिरीजवळ आला. विहिरीचे पाणी खोल गेले होते. पाटातून जाणारे पाणी थांबले होते. काही रोपांनी गुलामाप्रमाणे आपल्या माना वाकविल्या होत्या. काही रोपांना अतिशय तहान लागली होती. पाटाचे पाणी, वाळलेली पाने मध्ये



पडल्यामुळे तुंबले होते. हा सर्व देखावा पाहून झांथस संतापला. त्याने मोठ्याने हाक मारली, "इसाऽऽप, इडास, गरियन, इकडे या. बागेकडे पहा. इसाप तू सगळ्या झाडा-

कडे पहा. आणि पिकलेली पाने आकडीने काढ, त्यांचा ढीग कर आणि मला दाखीव. इडास तू बादली घे आणि विहिरीचे पाणी काढ, पाणी खूप खोल आहे. ए बैलोबा, नीट लक्ष दे. भराभर पाणी काढ नाहीतर तुझ्या चकण्या डोळ्यातून पाणी काढीन. सगळ्या बागेतील पाटातून पाणी खळखळा वहात राहिले पाहिजे." नंतर तो गरियनला म्हणाला की, तू सगळ्या रोपांना पाणी दे. तू पाण्याच्या प्रवाहाबरोबर चालत जा. दुपारपर्यंत हे काम पुरे झाले पाहिजे. त्यानंतर तुम्हाला भाकरी मिळेल. माझी बाग पाण्याशिवाय उपाशी राहिली. तुम्हाला लाजा वाटल्या पाहिजेत.

या भाषणानंतर थरथर कापणारे ते तीन गुलाम काम करू लागले. इसाप शेकाटा घेऊन पाने तोडू लागला. हात उंच करून त्याची छाती दुखू लागली. इडास पाणी काढू लागला, विहीर खोल असल्यामुळे त्याचे हात काचले. त्यातून रक्त वाहू लागले. तो घामाने निथळला. त्याने गरियनकडे पाहिले. गरियनचे काम फार सोपे होते. म्हणून तो गरियनला म्हणाला, "मित्रा ! मी तुझे काम करतो, तू थोडा वेळ विहिरीतील पाणी काढशील का ? मला आता एकही बादली ओढवत नाही. इसाप तू तरी या मित्राला सांग रे." हे ऐकून गरियन मानभावीपणाने म्हणाला, "अरे आपण गुलाम आहोत. येथे कोणीही कोणाचा मित्र नाही. झांथस साहेबानी हे सांगितलेले काम करणे हे आपले कर्तव्य आहे. मी तुला पाणी काढण्यास मुळीच मदत करणार नाही." हे उद्धट उत्तर ऐकून इडासला घेरी आली. तो रडू लागला. ते पाहून इसाप म्हणाला, "गरियन तू इडासला पाणी काढण्यास मदत कर. इडास हा परटाच्या

गाढवाप्रमाणे कष्ट करीत आहे. आणि तू परटाच्या घोडचा-प्रमाणे वागत आहेस. शेवटी त्या घोडचाप्रमाणे तुझी स्थिती होईल."

हे भाषण ऐकून गरियन म्हणाला, "इसाप परिटाचे गाढव आणि घोडा यांची काय गोष्ट आहे ती मला सांग. तुझी गोष्ट मला पटली तर मी पाणी काढण्यास मदत करीन."

हे भाषण ऐकून चतुर इसाप गोष्ट सांगू लागला. तो म्हणाला एका गावात एक परीट रहात होता. तो परीट डोक्यावर कपडयांचे मोठे गाठोडे घेऊन कावराबावरा होऊन नदीच्या काठाकाठाने चालला होता. त्याच्या हातात एक काठी होती. तो लंगडत चालला होता. व इकडे तिकडे टवकारून पाहात होता. कारण त्याचे लंबकर्ण नावाचे एक गाढव होते. ते पळून गेले होते. त्या बुटक्या गाढवाच्या अंगावर राठ केस होते. त्याचे शेपूट लांबट असून टोकाला थोडे केस होते. त्याच्या आखूड मानेवर आयाळ नव्हते. त्याच्या दोन्ही नाकपुडचा चिरलेल्या असून पडदा खाली लोंबत होता, अशा वर्णनाच्या त्या गाढवाला शोधीत असतांना त्या परटाला " हा चिक् भो हा भो हा हाक " असा गर्दभध्वनि ऐकू आला. इतक्यात ते गाढव धावत आले. कारण त्याच्यामागे एक कुत्रा धावत होता. कुरणातील हिरवे गवत खाल्ल्यामुळे हा प्रसंग ओढवला. परटाने त्या लंबकर्णाला पकडले आणि कुत्र्याला हाकून दिले. गाढवाच्या पाठीवर कपडयांचे ओझे टाकले. तो परीट स्वत: गाढवाच्या पाठीवर बसला आणि काठीने धोपटीत त्याने त्याला घरी आणले. कपडयांचे ओझे उतरवून ठेवले आणि गाढवाला गव्हाणीत बांधले. ओझ्याच्या भाराने आणि काठीच्या

माराने जर्जर झालेले ते मरतुकडे गाढव मट्‌दिशी खाली बसले.



जवळच्या गावात गुरांचा बाजार होता. तेव्हा तो परीट आपल्या बायकोला म्हणाला, "कारभारणी ! मी गुरांच्या बाजाराला जातो आणि एक मस्त घोडा विकत आणतो. हा लंबकर्ण आता निकामी झाला आहे." असे बोलून तो परीट गुरांच्या बाजारात गेला. तेथे त्याला काय दिसले ? एका घोड्याचे पोट खपाटीला गेले होते. दुसऱ्याच्या तोंडाला फेस आला होता. तिसऱ्या घोड्याच्या पाठीवर लगाम घासल्यामुळे चकती निघाली आहे त्यावर माशा घोंघावत आहेत याप्रमाणे पाहता पाहता त्याला एक घोडा पसंत पडला व त्याने तो खरेदी केला. घोडा खरेदी करून घरी आणला. त्याचे नाव होते खंड्या. घोडा दारात आल्यावर परटिणीने त्याच्या कपाळावर हळदीकुंकु लावले.

त्याला ओवाळले आणि गोठ्यात गाढवाजवळ आणून बांधले. शिजविलेल्या हरभऱ्याचे घमेले घोड्यापुढे ठेवले. पण गाढवाला फोलपटांची मेजवानी मिळाली.

घोडा आणि गाढव एकाच गव्हाणीत समोरासमोर आल्याबरोबर त्यांच्यांत धुसफूस सुरू झाली. आठ दिवस गेल्यानंतर लाथाळीला प्रारंभ झाला. पुढे घोडा आपल्याला आवरत नाही असे पाहून गाढवाने शाब्दिक भांडण सुरू केले.

गाढव : काय रे खंड्या ! तू अगदी माणूस आहेस ! येथे आलास आणि माझ्या अन्नात माती कालवलीस. आपला धनी तुला हरभऱ्याचा तोबरा देतो आणि माझ्या-पुढे फोलपटे पसरतो.

घोडा : काय रे फोलपट बडबडणाऱ्या गाढवा, गप्प बसतोस का देऊ एक पेकाटात लाथ : अरे मूर्खा, तुला फोलपटे मिळतात हे भाग्य समज. हा परीट सज्जन आहे. नाहीतर दुसऱ्या परटाने तुला उकीरडे फुंकायला लावले असते.

याप्रमाणे त्यांचा वाद चालू असताना तो परीट तेथे आला. त्याने गव्हाणीकडे पाहिले. फोलपटे बाहेर पडली होती. ते पाहिल्यावर गाढवाच्या पाठीत बकदिशी एक काठी बसली. गाढव श्वास टाकून रडू लागले. घोडा आनं-दाने खिकाळू लागला. परीट गाणें गुणगुणू लागला. गाणे गुणगुणत घोड्याच्या पाठीवर थाप मारून तो परीट घरात गेला. तो गेल्यावर संतापलेला गाढव म्हणाला :

गाढव : अरे खंड्या, तुझ्या कुळाचा सत्यनाश होईल. तू आलास आणि तुझ्या पायगुणाने माझे हाल सुरू झाले

धनीं तुझ्या पाठीवर स्वार होतो. गाणें गुणगुणतो. पण माझ्या पाठीवर मात्र मिठाच्या गोण्या लादतो.

घोडा : अरे लंबकर्णा ! तुझी योग्यताच तशी आहे. मिठाच्या गोणीचे काय झाले ते मला माहीत आहे.

गाढव : काय डोंबल माहीत आहे तुला ? मी त्या गोण्या नदीच्या पलीकडे पोहोचविल्या.

घोडा : मुळीच नाही. तू नदीतून जाताना पाय घसरल्याचे सोंग करून खाली बसलास त्यामुळे मीठ विरघळले. तुझे ओझें कमी झाले.

गाढव : अरे खरेच. मी घसरलो होतो.

घोडा : अरे चोरा, तू मुद्दाम घसरलास. धन्याचे नुकसान केलेस आणि त्याचे फळही भोगावे लागले.

गाढव : कसले फळ ?

घोडा : अरे, मी सर्व ऐकले आहे. मीठ विरघळून गेल्यावर दुसऱ्या दिवशी धन्याने तुझ्या पाठीवर एक मण चिंचेचे पोते ठेवले. ते ओझे कमी करण्याकरिता तू नदीत बसलास ओझे अधिकच जड झाले. नंतर धन्याने धोपटीत धोपटीत तुला बाजारात नेले. अरे गाढवा, तुझ्या डोक्यात जो मेंदू आहे ना त्याचे स्क्रू ढिले झाले आहेत.

गाढव : अरे तुझ्या डोक्यातले स्क्रू सुद्धा ढिलेच आहेत.

घोडा : अरे लंबकर्णा ! माझी हेटाळणी करू नकोस. पळताना पाय लंगडा झाला म्हणून मला मालकाने विकले.

गाढव : आपला धनी सांगत होता खरे.

धोडा : काय सांगत होता ? आणि तुला माझ्या गोष्टी कान लांब करून ऐकण्याचे कारण काय ?

गाढव : अरे खंड्या, किती खिकाळतोस ? माझे कान

लांब आहेत आणि तुझे आखूड आहेत.

घोडा : अरे, माझे कान आखूड आहेत म्हणूनच धनी माझ्या पाठीवर बसतो आणि तुझ्या पाठीवर चिंचेचे ओझे बसवितो. लंबकर्ण, तुम्ही उकीरडे फुंका आणि मुकाट्याने ओझी वहा.

गाढव : अरे घोड्या ! मी तर ओझी वाहतो आहेच; पण असे भविष्य सांगतो की, एक दिवस असा उगवेल की, त्या दिवशी तुला दोन गाढवांचे ओझे वहावे लागेल.

हे बोलणे चालू असताना दारू पिऊन पिऊन धुंद झालेला तो परीट तेथें आला. त्याने गाढवाला कान धरून बाहेर काढले. घमेलेभर फोलपटे त्याच्यापुढे टाकली. गाढवानें शेपटी हालवीत आणि मिटक्या मारीत ती फोलपटें खाल्ली. खाणे संपल्यावर परटानें त्या हडकुळ्या गाढवाच्या पाठीवर ओल्या कपड्यांची तीन ओझी टाकली. ते गाढव पाठीमध्यें वाकले आणि थरथरत कसेबसे उभे राहिलें. सूर्य वर आला होता. ऊन रणरणत होते. परटानें गाढवाच्या तंगडीवर एक काठी मारली. ते गाढव एक एक पाऊल उचलीत धडपडत कसे तरी चालू लागले. याच वेळी घोड्याच्या पाठीवर फाटके खोगीर ठेवून तो परीट स्वार झाला. घोड्यावर बसून तो गाढवाला हाकलू लागला. गाढव धापा टाकीत कान उंचावीत शेपटीने माशा उडवीत हळूहळू नदीपर्यंत पोहोचलें. त्याला वाटलें आता आपल्या पाठीवरील ओझे कमी होणार, पण दैव त्याला अनुकूल नव्हते. उन्हाळ्यामुळे नदीमध्यें कपडे धुण्याइतके पाणी नव्हते, म्हणून दुसऱ्या ओढ्याकडे परटानें आपला मोर्चा वळविला. त्याने गाढवाचे तोंड ओढ्याकडे वळविले. गाढवाला घराची ओढ

लागली होती. ते तहानेनें व्याकुळ झाले होते. त्याचे प्राण कासावीस होऊन डोळ्यात आले होते. या वेळी त्याचा धनी जरा विसावा घेण्यासाठी झाडाखाली जाऊन बसला होता. त्याला झोप लागली हे पाहून ते चिडलेले, दमलेले आणि भागलेले हडकुळे गाढव त्या घोड्याशी विनवणीच्या आवाजात बोलू लागले.

गाढव : मित्रा घोड्या !

घोडा : आँ ! मी तुझा मित्र कधीपासून झालो ?

गाढव : अरे, मला असे नको रे टोचून बोलू. हे गावातील लोक त्याची मुले वाईट निघाली म्हणजे त्यांना गाढव म्हणून हाका मारतात. माझी हेटाळणी करतात. तू सुद्धा तसेच करतोस काय ? मित्रा जरा माझ्या जवळ ये.

घोडा : हां ! दूर हो. मला विटाळ होईल तुझा. काय काम असेल ते लांबून बोल.

गाढव : काम फार थोडे आहे. माझ्या पाठीवर तीन ओझी आहेत, ती मला पेलत नाहीत. आपला धनी जागा होईल आणि धोपटीत धोपटीत मला ओढ्याकडें नेईल. पण त्यापूर्वींच माझे प्राण शरीरातून निघून जातील. म्हणून तुला एक विनंती करितो की, यातले एक गाठोडें तू आपल्या पाठीवर घें म्हणजें मी हळहळू कसा तरी चालेन. तूच आपल्या तोंडानें गाठोडें उचललेस म्हणजे धनी रागावणार नाही. मग घेतोस ना एक गाठोडे ?

घोडा : मुळीच नाही, आज मला सोमवार आहे. उपास आहे. आज मी फक्त शेंगाचे दाणें खातो. तुला सोवळे ओवळे काही नाही. आज उपवासाच्या दिवशी गाठोड्यातील अनेक जातीच्या कपड्यांना मी शिवणार नाही. हें गांठोडे जर मी

उचलले तर विटाळ होईल. चल हो दूर.

बिचारे गाढव चालूं लागलें. धनी जागा झाला त्यानें काठी घेतली आणि गाढवाच्या पोटावर सप्पदिशी मारली. गाढव थरथर कांपूं लागलें त्याला कंपवात झाला. ते घाबरलें, बावरले थोडे पुढे झाले. गरगरा फिरले आणि त्यानें अंग टाकले. गाठोडी दूर पडली. गाढवानें डोळे फिरविले. त्याचे प्राण त्याच्या जीर्ण देहातून स्वर्गांत गेले.

हे पाहिल्यावर परटाची दारूची धुंदी उतरली. त्यानें आजूबाजूला पाहिले. मदतीला कोणीहि नव्हते. आता काय करावे ? मेलेले गाढव स्मशानात कसे न्यावे, गाठोडी घरी कशी न्यावी ? विचार करिता करिता त्याला युक्ति सुचली त्याने घोड्याकडे पाहिले. तो घोडा धावण्याच्या ऐटीत उभा होता. परटाने ते गाढव ओढींत ओढीत आणले. एक रट्टा मारून घोड्याला खाली बसविले. त्याच्या पाठीवर ते मेलेले गाढव ठेवले आणि त्या गाढवाच्या पाठीवर ती ओली गाठोडी ठेवली. पुन्हा काठी मारून घोड्याला उभे केले. दोन गाढवाचे ओझे घेऊन तो गर्विष्ठ घोडा चालूं लागला. त्याच्या तंगड्यावर काठ्या बसत होत्या. तेव्हा तो मनात म्हणाला, " अरेरे ! गरीब बिचारे गाढव ! मी याचे थोडे ओझे घेतले असते तर हा प्रसंग आला नसता. आतां मरेपर्यंत या परिटाचे आणि कपड्याचे ओझें मला वागवावे लागणार. म्हणजे दोन गाढवाचें ओझें माझ्या पाठीवर बसणार. परमेश्वरा ! मला या संकटांतून सोडीव. माझे गर्वाचे घर खालीं झालें आहे."

ही गोष्ट ऐकून गरियनला पश्चात्ताप झाला व त्याने इसापचे सांगण्याप्रमाणे कामास मदत केली.

• • •

६

# मी समुद्र पिऊन टाकीन

दुपार झाली आहे. हळू हळू झांथसचे मित्र मेजवानी-साठीं येऊ लागले. जेवण्याची व्यवस्था सकाळपासून चालू होती. सगळे घर सुशोभित झाले होते. कुत्रा घोड्याच्या तबेल्यात नेऊन बांधला. आणि बाईसाहेब लाजाळूप्रमाणे लवत सगळीकडे हिंडत होत्या. स्वयंपाकघरांतून पक्वान्नाचा सुगंध येत होता. पत्नी बाहेर आली आणि तिने झांथसला नेत्रसंकेताने जेवण्याची तयारी आहे असे सुचविले. सर्व मित्र भोजनास बसले आणि त्यांच्या गप्पा सुरू झाल्या, शांतपणाने भोजन उरकले आणि सर्व मित्र दिवाणखान्यात येऊन बसले. या वेळी इसाप बाहेरच्या दारावर येऊन बसला होता. तो अतिशय कुरुप असल्यामुळे घरात आला नाही इतर गुलाम घरात काम करीत होते. इसाप धन्याला यश मिळावे म्हणून दाराजवळ सूर्यदेवाची प्रार्थना करीत होता.

दिवाणखान्यात मित्रांच्या गप्पा गोष्टी सुरू झाल्या. त्यावेळच्या पद्धतिप्रमाणे सर्वांनी एकमेकांचे शुभचिंतन करून थोडी थोडी मदिरा घेतली. त्यानंतर एक मित्र म्हणाला, " झांथस तुमचे तत्त्वज्ञान रोज आम्ही ऐकतों. आज तुम्ही आमचे ऐका. आज तुम्ही आमच्याबरोबर पत्ते खेळा." झांथसने ते मान्य केले आणि चार जणांनी

पत्त्याचा डाव सुरू केला. बाकीच्यांनी प्रेक्षकाचे काम केले. त्यातील एक मित्र मधूनमधून मद्याचे पेले सर्वांना भरून देऊ लागला. विमाने वर चढू लागली. पत्त्याचा डाव जोरात आला. पत्त्यानंदी लागली टाळी कोण देहाते सांभाळी अशी स्थिति झाली. होता होता ते चौघेजण पैसे लावून खेळू लागले. पहिले तीन डाव झांथसनें जिकले. पुढे त्याचे प्रतिस्पर्धी सारखे डाव जिंकू लागलें. झांथसचे पैसे प्रतिस्पर्ध्याकड जाऊ लागले. त्याचे डोळे तारवटले होते. शुद्ध हरपली होती आणि बेभान होऊन तो पत्ते खेळत होता. एक मित्र म्हणाला " आपण आता पैज लावून खेळू या. हा डाव जर मी जिंकलो तर तू चारशे ग्लास मदिरा पिऊन दाखव आणि तूं जिंकलास तर मी चारशे ग्लासच काय तर सबंध समुद्र पिऊन टाकीन आणि जर मी समुद्र प्यालो नाही तर तुला माझे घरदार बक्षिस देऊन टाकीन " हे बोलणे ऐकून थोडा शुद्धिवर असलेला तो मित्र म्हणाला, " आपण आताच सर्व भाषण कागदावर लिहून करार करूं. झांथस जिंकला तर मी ४०० ग्लास मदिरा ध्यावी आणि मी जिंकलो तर झांथसने उद्यां संध्याकाळी भरतीचे वेळी समुद्र पिऊन दाखवा."

डाव खेळला गेला. झांथसच्या विरुद्ध निकाल लागला आणि विरुद्ध निकाल लागल्यावर झांथसची मदिरा उतरली. झांथसने मागे वळून पाहिले तो गरीब बिचारा इसाप त्याच्याकडे पाहात होता. धनीसाहेब मदिरेच्या आहारी जाऊन आपण काय केलेत असे तो आपल्या डोळ्यांनी बोलत होता. पुढे सभा संपली मित्र आपापल्या घरी गेले

आणि झांथस चिंता करीत बसला. समुद्र पिऊन टाकणे अशक्य आहे. उद्या संध्याकाळी आपली फजिती होणार. सगळ्या अथेन्स शहरात आपला बदलौकिक होणार, हाच तो दारुडा असे म्हणून टवाळ लोक आपली चेष्टा करणार असे झांथसला वाटू लागले. निर्जिव शरिराला चिता जाळून टाकते पण अनुस्वार दिल्यावर चिंता जाळू लागते. आता ती चिंता हरण करणारा चिंतामणी आपणाला कोठे भेटेल असा विचार मनांत आल्यावर झांथसला एकदम इसापची आठवण आली. त्याने इसापला हाक मारली आणि समुद्र-प्राशनावर रामबाण उपाय सुचविण्यास सांगितले. इसापने त्या कराराचा विचार करून ठेवला होता. तो रात्रभर विचार करीत होता आणि त्याच्या सागरासारख्या शांत मनातून एक बिनतोड कल्पना निर्माण झाली होती. ती कल्पना इसापने झांथसला सांगितली. ती कल्पना ऐकल्या-बरोबर झांथसची चिंता नाहीशी झाली. त्याचा चेहरा प्रफुलित झाला.

दुसरा दिवस उजाडला सायंकाळी हळूहळू समुद्रकिना-ऱ्यावर ती वार्ता ऐकून लोक जमू लागले. समुद्रात उंच आसन तयार केले होते. त्या आसनावर उभे राहून झांथस समुद्र प्राशन करणार होता. सूर्य अस्तास चालला होता. झांथसच्या चातुर्याचा कीर्तिसूर्य वर येणार होता. त्या सूर्याचा सारथी अरुण दूर उभा होता. त्या अरुणाला–त्या इसापला–कीर्तीचा लोभ नव्हता. बरोबर सहा वाजले. अरुण दूर उभा होता. त्या अरुणाला त्या इसापला–कीर्तीचा लोभ नव्हता. बरोबर सहा वाजले. घडघड असा रथाचा

आवाज ऐकू आला. झांथस खाली उतरला आणि पुढे जाऊन समुद्रांतील आसनावर उभा राहिला. सर्व लोक तटस्थ होऊन पाहात होते. टाचणी पडली तर ऐकू येईल इतकी शांतता पसरली होती. मानवी प्रेक्षकांचा सागर उचंबळत होता आणि समोर खारे पाणी असलेल्या सागराला भरती येत होती. झांथसने एक पेला हातात घेतला आणि त्याने करार वाचला. " माझा पराजय झाल्यास मी समुद्र पिऊन टाकीन " हे वाक्य मोठ्याने उच्चारून झांथस म्हणाला, " लोकहो समुद्राचे पाणी खारे असते. सहा वाजता स्थिर असलेला समुद्र मी पिणार आहे. त्यातील



खारे पाणी पिणार आहे. या समुद्राच्या भोवती, समुद्राच्या सीमेच्या पलिकडे शेकडो गोड्या पाण्याच्या नद्या वाहात आहेत. त्या नद्या बांध घालून थांबवून धरा. गोड्या

पाण्याचा एक पेला यापुढे समुद्रात आला तर आपला करार रद्द होईल." हे वाक्य ऐकल्याबरोबर जनसमुद्रात हास्याच्या लाटा उसळल्या. लोकांनी झांथसला रथावर बसविले. कराराचा कागद समुद्रात फेकून दिला. मित्रांचा पराजय झाला. झांथसने मनात निश्चय केला यापुढे मदिरा घ्यावयाची नाही. लोकांनी त्याची रथावरून मिरवणूक काढली.

• • •

७

# बेडकाने पाहिलेले बैल

मालकाने इसापला गुलामीतून मुक्त केले. इसाप लिडीयाच्या राज्यातील स्वतंत्र नागरिक झाला. तेथील एका मोठ्या दिवाणखान्यात तो मुलांना गोष्टी सांगे. त्या गोष्टी ऐकण्याकरिता पोरांप्रमाणेच थोरांचीही गर्दी होऊ लागली. मोठे लोक गोष्टी ऐकण्यास येत आहेत असे पाहून इसापने राजकारणावर आधारलेल्या काही रूपककथा सांगण्यास प्रारंभ केला.

लिडीयाच्या राजाच्या पदरी अनेक सरदार होते. त्यांना पैसे खाण्याशिवाय दुसरा उद्योग नसे. लिडीयाचा राजा सत्त्वशील होता; तो या अप्रामाणिक सरदारांना शिक्षा करी. त्यामुळे हे सरदार संतापले होते. याच वेळी जवळच अस-

लेल्या स्पार्टाच्या राजानें लिडीयाच्या राज्यावर हल्ला केला. राजा एकटा पडला, कारण त्याचे अप्रामाणिक सरदार आपापली सैन्ये घेऊन येईनात. तेव्हा त्या सरदारांचे मन वळविण्याकरिता राजाने एक सभा घेतली आणि इसापला गोष्टीरूपाने त्याना बोध करण्यास सांगितले. सरदार आणि त्यांचे सैनिक दरबारात जमले. तेव्हा इसाप उठून उभा राहिला आणि त्याने गोष्ट सांगण्यास सुरुवात केली.

"माझ्या मित्रांनो, तुम्ही सरदार आहात, थोर आहात, विद्वान् आहात, तुम्हाला मी काय सागणार? पण राजेसाहेबांची आज्ञा म्हणून एक गोष्ट सांगतो. एक लहानसे खेडे होते. त्या खेडयाजवळ लहानसे तळे होते. त्या तळयात लहान लहान बेडूक रहात असत. ते बेडूक दिवसभर उडया मारीत व मारामारी करीत. त्यांच्यामध्ये एक म्हातारा बेडूक होता. तो शहाणा व विचारी होता. त्याने सगळया तरुण बेडकांना एकत्र बोलाविले आणि तो म्हणाला, "मित्रांनो आपण दोन हजार बेडकांचे सैन्य उभारू या" तेव्हा एक खुशालचेंडू बेडूक म्हणाला, "करायचे काय सैन्य? आपण फार शहाणे आहात. आम्ही रोज खेळतो, बागडतो, मारामारी करतो यात कुठेही व्यत्यय आला नाही. मग सैन्य करायचे काय?"

इतक्यात धाड् धाड् असा आवाज ऐकू आला. सगळे बेडूक दचकले. तेव्हा तो म्हातारा बेडूक म्हणाला, "मित्रांनो. समोर पहा तळयाच्या काठावर काय चालले आहे ते. ते पाहून सगळया बेडकांनी डुबुकदिशी उडी मारली. ते काठाजवळ आले आणि मान उंचावून, डोकावून समोर पाहू लागले. तेव्हा त्यांना असे दिसले की, एक काळया रंगाचा

पुष्ट बैल पुढे आला होता. त्याची शिंगे टोकदार होती, वशिंड भरदार होते. त्याच्या कपाळावर एक पांढरा ठिपका होता. त्याने डरकाळी फोडली, मान खाली घातली, शेपटी उंच केली, तो उजव्या पायाच्या खुराने जमीन उकरू लागला. इतक्यात समोरून एक पांढऱ्या रंगाचा प्रचंड बैल धावत आला. त्याचे डोळे तांबारले होते. त्याच्या कपाळावर काळा ठिपका होता. तो जोराने पुढे आला आणि त्याने धाडदिशी



काळ्या बैलाच्या कपाळावर टक्कर दिली. ते पाहून बेडूक घाबरले. एक बेडूक म्हाताऱ्या बेडकाला म्हणाला, "आता काय होणार? हे बैल जरी भांडत आहेत तरी आम्हांला त्रास नाही. हे गवत खातात आम्ही किडे खातो, यांची जात वेगळी, रीत निराळी. आम्हाला त्रास देण्यासाठी ते भांडत नाहीत. मग आम्ही मूर्खासारखे सैन्य उभारून काय करायचे आहे? आम्ही आपले थोडा वेळ गंमत पाहू आणि भीति

वाटली तर दोन फूट खोल असलेल्या तळ्याच्या तळाशी चिखलात बसून राहू" म्हातारा बेडूक म्हणाला, "मूर्ख पोरांनो, तळ्याच्या संरक्षणासाठी सैन्य उभारले नाही तर काय परिणाम होतो ते आताच पहा."

काळ्या आणि ढवळ्या टकरा घेत होते. जोराने श्वास टाकीत होते. एकमेकांना मागे रेटीत होते. शेवटी ढवळ्याने वीस पावले धावत धावत येऊन डरकाळी फोडून काळ्याच्या कपाळावर टक्कर दिली. काळ्याच्या कपाळातून रक्त वाहू लागले. त्याचा पराजय झाला. तो बावरला, घाबरला आणि मागे वळला. त्याने तळ्यात उडी मारली. पाणी उडवीत, धडपडत तो तळ्याच्या पलीकडे जाऊ लागला. त्यावेळी त्याच्या पायाखाली साठ बेडूक चिरडून गेले. तेव्हा मरता मरता एक तरुण बेडूक म्हणाला, "अरेरे! आपण म्हाताऱ्याच्या सांगण्याप्रमाणे ऐकले असते आणि सैन्य उभारले असते तर आपले तळ्याचे राज्य नाहीसे झाले नसते!"

• • •

## ८

# चोरीचा आळ

इसापच्या गोष्टी ऐकून एक सरदार दुसऱ्या सरदाराला हळूच म्हणाला, "सैन्य जमविण्याकरिता हा इसाप धडपड करीत आहे. याला वाटते की आम्ही तळ्यातील बेडका-प्रमाणे मूर्ख आहोत. आपल्या प्रत्येक सरदाराचे संस्थान हे

लहानसे राज्य आहे, त्या राज्यात आपण इसापला पकडून. ठेवू. आपण एक युक्ती करू आणि चोर म्हणून इसापला पकडू. त्या चोरीकरिता न्यायाधिशाला आधी लाच देऊन ठेवू आणि या प्रामाणिक इसापला चोर ठरवून त्याचा कडेलोट करू."

कारस्थान तयार झाले होते. इसापला त्याची कल्पना नव्हती. रात्रीच्या वेळी एक चोर त्याच्या घरात शिरला आणि त्याने एका प्रसिद्ध देवालयातील दागिने इसापच्या दागिने ठेवण्याच्या कपाटात ठेवले. चोर निघून गेला त्यावेळी इसाप गावाला गेलेला होता. घराला बाहेरून कुलूप होते. पुढे इसाप घरी आला. कुलूप उघडताना पाल चुकचुकली! इसाप म्हणाला, "अरेरे! काहीतरी वाईट होणार;" कुलूप उघडून इसाप आत गेला, घरातील वस्तु अस्ताव्यस्त पडल्या होत्या, दागिने ठेवण्याच्या खोलीचे दार उघडे होते. इसाप पहात राहिला, भांबावला, शून्य नजरेने समोर पाहू लागला. आपण गुलामगिरीत वाढलो, आपल्याला स्वतंत्रता मिळाली. ४ वर्षे स्वतंत्रतेचा उपभोग घेतला नाही तोच आपल्यावर कोणते संकट कोसळणार आहे कोणास ठाऊक? पुन्हा गुलामगिरीच्या बेड्या हातात पडणार की काय? तसे असेल तर फाशी किंवा कडेलोट पुरविला पण गुलामगिरी नको!"

याप्रमाणे त्याचे विचारचक्र चालू असताना "थाड थाड" असा शिस्तीने चाललेल्या सैनिकांच्या पावलांचा आवाज त्याला ऐकू आला. ती पावले त्याच्या घराच्या दाराजवळ थांबली आणि त्याने मागे वळून पाहिले तो एक फौजदार व दहा शिपाई दाराशी उभे होते.

इसाप–आपल्याला काय पाहिजे?

फौजदार–आम्हाला इसाप नावाचा स्वतंत्र झालेला गुलाम पाहिजे आहे.

इसाप–माझेच नाव इसाप.

फौजदार–आम्हाला तुमच्या घराची झडती घ्यावयाची आहे?

इसाप–मी कोणता गुन्हा केलेला आहे ?

फौजदार–तू भक्तिभावाने इडास नावाच्या प्रसिद्ध देवालयात रोज जातोस ना ?

इसाप–होय, मी तेथे भक्तिभावाने दर्शनास जातो.

फौजदार–भक्तिभावाने दर्शनास नव्हे तर युक्तिभावाने तू चोरी करण्यास काल तेथे गेला होतास. देवाच्या अंगावरील दागिने तू चोरलेस असा तुझ्यावर अरोप आहे. शिपायांच्या प्रमुखाने हे आरोपपत्र माझ्याजवळ दिले आहे. आम्ही तुझ्या घराची झडती घेणार आहोत.

इसाप–माझ्यासारख्या गरीबावर हा आळ येतो आहे. मी गुलाम असताना पेरू चोरल्याचा आळ माझ्यावर आला होता. पण मिठाचे पाणी पिऊन मी पेरू खाल्ले नाहीत असे सिद्ध केले. माझे धनी झांथस यांनी माझी गुलामगिरीतून मुक्तताकेली. अरेरे! स्वातंत्र्यापेक्षा झांथसकडे केलेली गुलामगिरीच बरी! झांथस महाराजांना बोलवा. ते माझ्या प्रामाणिपणाबद्दल खात्री देतील.

फौजदार–झांथस दुसऱ्या राज्यात आहे. त्याला बोलावण्याची आम्हाला जरूर नाही. मुकाट्याने तुझे दागिन्याचे कपाट दाखव नाहीतर मिठाच्या पाण्यात बुडविलेला फटका तुझ्या पाठीवर बसेल. मिठाचे पाणी पिऊन आता सुटका होणार नाही.

फौजदार व त्याचे शिपाई घरात घुसले. तो सर्व प्रकार इसाप निराश नजरेनें पहात होता. फौजदारांनी धाडदिशी कपाट उघडले. भराभर त्यातील वस्तू बाहेर फेकल्या आणि शेवटी एक डबा बाहेर काढला. इसापला वाटले आपल्या डोक्यावर वीज कोसळत आहे. त्याचे शरीर थरथरा कापू लागले. त्याच्या कपाळावरून घाम निथळू लागला. त्याच्या शरीराला असंख्य सुया टोचू लागल्या. इतक्यात फौजदाराने दागिन्याच्या डब्याचे झाकण उडघले. त्यामध्ये देवालयातील दागिने दिसत होते. रत्नहार बहुमोल होता. देवाचा मुगुट झळकत होता. देवाच्या हातातील हिऱ्याच्या अंगठ्या चमकत होत्या. इसापला वाटले यातील एक हिरा गिळून टाकावा आणि प्राण देवाला अर्पण करावेत. इतक्यात फौजदाराने शिपायास आज्ञा केली की देवाचे दागिने चोरणाऱ्या या हरामखोराला बेड्या घाला व न्यायाधिशाकडे घेऊन चला. इसापच्या हातात बेड्या पडल्या. त्याची रस्त्यातून धिंड निघाली. त्याच्या गोष्टी ऐकणारी हजारो मुले त्याच्या मागून चालत होती. त्यांच्या निर्मळ हृदयास असे वाटत होते की, आपला इसाप कधीही चोरी करणार नाही. शिपायांनी लाठ्या फिरवून मुलांना पांगवले. पैसे खाणारे अप्रामाणिक सरदार इसापच्या मागोमाग जाऊ लागले. दारू पिऊन धुंद झालेले न्यायाधीश आसनावर बसले होते. दागिन्याचा डबा त्याच्यापुढे आला. फौजदारांनी फिर्याद पुढे मांडली आणि शिपायांनी साक्ष दिली. इसापला एकही शब्द बोलण्याची संधी न देता न्यायाधीशांनी गर्जना केली की "प्रामाणिकपणाचा देखावा करणाऱ्या इसाप तू एक प्रख्यात दरोडेखोर आहेस. चोरी करण्याचा आरोप तुझ्यावर सिद्ध

झाला आहे. उद्या सकाळी पश्चिमेच्या डोंगरावर असलेल्या कड्यावरून तुला लोटून देण्यात येईल. तुझ्या देहाला मूठ-माती मिळणार नाही. कडेलोटानंतर तुझ्या देहाच्या चिंध-ड्यांची गिधाडांना मेजवानी मिळेल." तो निकाल ऐकून इसाप बेशुद्ध पडला.

जागा झाल्यावर त्याला ओढीत डोंगराजवळ नेण्यात आले. सरदार आणि त्याचे सैनिक कडेलोटाची गंमत पहाण्या-करिता तेथे होते. त्यावेळी इसाप म्हणाला, "लोकहो, देव तुमचे कल्याण करो ! मी मेलो तरी माझ्या गोष्टी लहान मुले ऐकत रहातील. तुम्ही मला विसरलात तरी निष्पाप हृदयाची बालके मला विसरणार नाहीत. जगातील अनेक पिढ्या बालके माझ्या गोष्टी तन्मयतेने ऐकत आहेत असा देखावा माझ्या अंतःचक्षूंना दिसत आहे. त्या मुलांचे कल्याण होवो. आता मी तुम्हाला शेवटची एक गोष्ट सांगतो ती ऐका.

एका बागेजवळ एक विहीर होती. त्या विहिरीमध्ये उथळ विचाराचे काही बेडूक रहात असत. विहिरीच्या पलीकडे बागेचे कुंपण होते. त्या कुंपणाजवळ अनेक बिळे होती. त्या बिळात काही उंदीर रहात होते. कुंपणाच्यावर एक झाड होते. त्या झाडावरील फळे नासून गेली होती. त्यामुळे त्या फळात किडे निर्माण झाले. काही दिवसांनी त्या फळांचे देठ वाळून गेले आणि ती फळे धपदिशी खाली पडली. फळे खाली पडल्यावर त्यांतील किडे जीव वाचविण्याकरिता इकडे तिकडे धावू लागले. ते किडे खाण्याकरिता विहिरीतील बेडकांनी टपाटप तेथे उड्या मारल्या. तो आवाज ऐकून बिळांतील उंदीर बाहेर आले आणि म्हणाले, 'किडे आमच्या झाडावरून खाली पडले आहेत म्हणून आमचा त्यावर हक्क

आहे!" बेडूक म्हणाले, "हे किडे आमच्या झाडावरील आहेत. त्यावर आमचा अधिकार आहे. तरी तुम्ही चालते व्हा!" हे भाषण ऐकून एक उंदीर म्हणाला, "आता लढाईनेच आपण हा प्रश्न सोडवू. पण त्यापूर्वी एक साधे युद्ध करून पाहू. आमच्यातील एक पैलवान उंदीर आणि तुमच्यातील एक पैलवान बेडूक यांची मारामारी होऊ दे. जो जिंकील त्याच्या जातीने हे किडे खाऊन टाकावे." हे ऐकून एक उदी रंगाचा पुष्ट उंदीर, आपली शेपटी वळवीत, फुसकारत पुढे आला. त्याने आपल्या मिशा पिंजारल्या. नखे बाहेर काढली इतक्यात बेडकांच्या तरुण राजा पुढे झाला. त्याने टुणदिशी उंदराच्या शेपटीवर उडी मारली. दोघांची कुस्ती सुरू झाली. दोघेही घायाळ झाले. इतक्यात आकाशात एक घार घिर-



टया घालीत होती ती बाणाप्रमाणे खाली आली. तिने एक

पंजात उंदराला पकडले. दुसऱ्या पंजात बेडकाला पकडले आणि आकाशात झेप घेतली. त्यानंतर ती एका उंच झाडावर बसली आणि उंदीर व बेडूक यांच्या मांसावर तिने यथेच्च ताव मारला." ही गोष्ट संपल्यावर इसाप म्हणाला, "सरदारहो उंदीर आणि बेडूक या दोन जमातीप्रमाणे तुम्ही आपापसात-भांडत असता. आपल्या राज्यावर संकट आले आहे. अशा वेळी राजाला मदत करणे हे तुमचें कर्तव्य आहे. तुम्ही परक्यांचा कडेलोट करा. माझा कडेलोट करू नका."



हे ऐकून सरदार फौजदाराला म्हणाले, "फौजदारसाहेब या चोरट्या इसापचे काही ऐकू का. याचा ताबडतोब कडेलोट करा. म्हणजे या राज्यातील सगळा अप्रामाणिकपणा नाहीसा होईल." हे सांगत असताना एक सरदाराने फौजदाराला सोन्याचे कडे दिले आणि फौजदाराने इसापचा कडेलोट केला ! त्याच्या देहाच्या ठिकऱ्या झाल्या.

• • •

९

# जबड्यांत सांपडलेली चोच

एक लांडगा रात्री खुराड्याभोवती हिंडत होता. त्याचा करडा रंग, राठ केसांनी भरलेली मान, लांबोडा व बळकट असा जबडा, अणकुचीदार उभारलेले कान, गोंडेदार सरळ शेपूट आणि अर्धवट उघडलेले रागीट डोळे, हे पाहून कोंबड्यांची धावपळ सुरू झाली.

त्याने झडप घातली व तुरा असलेला एक कोंबडा पकडला आणि फाडून गट्ट केला. अधाशीपणे खात असताना त्या कोंबड्याच्या पाठीचे हाडूक लांडग्याच्या गळ्यात अडकले. ते आत जाईना की बाहेर येईना. तो आरडाओरडा करू लागला. मग तो रानात गेला व गडबडा लोळू लागला. कोल्हा, खोकड, चित्ता इत्यादि आपल्या मित्रांना त्याने मदत करण्यास विनविले. त्यांनी प्रयत्न केला, पण कोणालाहि ते घशातील हाडूक काढता येईना. शेवटी खोकड म्हणाला, "लांडगेदादा, तुम्ही पलीकडच्या ओढ्याजवळ जा. तेथे एक फताड्या पायाचा, पांढऱ्या रंगाचा आणि लांब चोच असलेला करकोचा राहतो. तो एक प्रसिद्ध वैद्य आहे. मोर, सांबर, जिराफ, सरडा अशा अनेक प्राण्याचे आजार त्याने बरे केले आहेत; तुम्ही त्याच्याकडे जा."

लांडगा धावत सुटला. ओढ्याजवळ आला. करकोचा औषधे तयार करीत होता. लांडगा म्हणाला,

"राम राम, वैद्यबुवा."

"राम राम. काय काम आहे लांडगोबा ?

" माझ्या घशात हाडूक अडकले आहे. मला वेदना सहन होत नाहीत. प्राण कासावीस झाले आहेत; तरी मला वाचवा."

"माझी फी दिली पाहिजे."

"किती पैसे द्यावयाचे ?"

" हे हाडूक काढण्याकरिता मी आपला राजा जो सिंह त्याच्या छापाचे शंभर रुपये घेईन."

लांडग्याने कबूल केले. मग करकोचा म्हणाला, "या समोरच्या उंच दगडाला टेकून ोन पायावर उभा रहा. शेपूट पोटाशी धर. डोळे मीट. मान उंच कर."

लांडगा याप्रमाणे दगडाला टेकून उभा राहिला. मग



करकोचा त्या दगडावर बसला. त्याने त्या झाडाचा गिळगिळीत रस काढला व तो लांडग्याच्या घशात ओतला. मग आपली लांब चोच त्याने लांडग्याच्या घशात घातली. हाडूक

पकडले. जरा आत ढकलले. थोडे फिरवून आडवे होते ते उभे केले आणि गिळगिळीत रसातून हळूच बाहेर काढले.

लांडगा डोळे तांबारून वाट चालू लागला. करकोच्याने त्याच्या क्रूर डोळ्याकडे पाहिले व तो एका बाभळीच्या फांदीवर जाऊन बसला आणि म्हणाला, " लांडगोबा, मला आता सिंहछापाचे शंभर रुपये द्या. "

लांडगा फिसकारून म्हणाला, " काय रे करकोच्या माझ्या जबड्यात चोच घातलीस. ती मी चावून तुझा खून केला नाही. तुझे प्राण तुला परत दिले. लांडग्याच्या तोंडात सापडलेली मान कधी जिवंत सुटली आहे काय ? आणखी रुपये कसले मागतोस ? जास्त गडबड करशील तर तुझा दवाखाना या ओढ्यात फेकून देईन. " अशी दटावणी देऊन तो लांडगा शेपटी पिंजारीत निघून गेला.

करकोचा मनात म्हणाला, " अशा दुष्ट लोकावर उपकार करताना जपूनच वागले पाहिज. "

• • •

१०

# मंदबुद्धीचे जीवन

अरवली पर्वताजवळ एक घनदाट अरण्य होते. त्या अरण्यात एकदा तापाची साथ सुरू झाली. त्या तापामुळे अनेक जनावरे पटापट मरू लागली. म्हणून पशूंचा राजा जो सिंह, त्याने एक सभा बोलाविली. वाघ, हत्ती, शहामृग, कोल्हा, लांडगा, ससा, बगळा इत्यादि जनावरे हजर झाली. सिंह म्हणाला, " आपल्यामध्ये जो कोणी प्रसिद्ध वैद्य असेल त्याने

पुढे यावे व तापाचे रोगी बरे करावेत." हत्ती म्हणाला, 'मला डोळ्याने नीट दिसत नाही.' वाघ म्हणाला, 'मला रात्री चांगले दिसते. पण दिवसा दिसत नाही, म्हणून मी औषध देऊ शकत नाही.' ससा म्हणाला "मला रात्री चांगले दिसते पण मी ते कडू औषध दिल्यावर वाघासारखे काही रोगी साखर म्हणून मलाच खाऊन टाकतील.' बगळा म्हणाला, 'मी लांडग्याच्या तोंडांतले हाडूक काढले आहे.' अस्वल म्हणाले, 'आता हाडूक काढावयाचे नाही, ताप काढावयाचा आहे. मी दगडाचे भस्म तयार केले आहे ते घ्या. म्हणजे कोणताही रोग बरा करता येईल. हे पावशेर दगडभस्म खाणारा प्राणी दगड सुद्धा फोडू शकेल.'

याप्रमाणे बोलत असता अस्वलाने एक दगड उचलला व तो एका मोठ्या दगडावर आपटला. तो काय चमत्कार! तो मोठा दगड फुटला व त्यातून एक बेडूक टुणकन् उडी मारून डराँव डराँव करीत बाहेर पडला, तो म्हणाला, "माझे नाव मंदबुद्धि. मी फार मोठा वैद्य आहे."

ती बडबड ऐकल्यावर कोल्हा म्हणाला, "मंदबुद्धे तुझे गिळगिळीत अंग गार पडत चालले आहे. कातडे आतील भागापासून निसटले आहे, तू आकाराने चौपट होत चालला आहेस, आधी स्वतःला बरे करा आणि मग इतरांना औषध द्या."

नंतर सिंह म्हणाला, "जनावरांनो, आपल्यात कोणीच चांगला वैद्य दिसत नाही. म्हणून मी एक औषध सुचवितो. सर्वांनी भरपूर मास खावे म्हणजे ताप जाईल." असे बोलून सिंह भोवताली पाहू लागला. हा आता आपल्याला खाणार

असे वाटून सर्व आजारी जनावरे पटापट उड्या टाकून पळून गेली आणि त्या धावण्याच्या व्यायामामुळे त्यांचा ताप बरा झाला.

मंदबुद्धि बेडकाने टुणकन एका डबक्यात उडी मारली. तेथे त्याला अनेक मित्र भेटले. त्या सर्वांना बोलावून त्याने रानातील सभेची हकीकत सांगितली. नंतर तो म्हणाला, "सिंह हा पशूचा राजा, बेडकांना राजा नाही. म्हणून आपण देवाची प्रार्थना करू व राजा मागून घेऊ." बेडकांनी डराँव डराँव असा आवाज करून देवाची प्रार्थना



केली, "देवा, आम्हाला राजा दे, म्हणजे तो आमच्यातील भांडणे नाहीशी करील व आजारी बेडकांना औषध देईल."

देवाने त्यांची प्रार्थना ऐकली व एक चौकोनी ओंडका डब-क्यात टाकला. तो पाण्यात 'धाड' असा आवाज झाला. पाणी वर उडाले. लाटा निर्माण झाल्या. सर्व बेडूक काठाकडे पळाले. पण काही वेळाने पाणी शांत झाले. मंदबुद्धि व इतर बेडूक त्या राजाकडे पाहू लागले. राजा हालेना, चालेना किंवा बोलेना. हळूहळू ते त्याच्याजवळ गेले व शेवटी ते त्या ओंडक्याच्या अंगावर उड्या मारू लागले.

मंदबुद्धि म्हणाला, "इतका गरीब राजा आपल्याला नको." मग त्या सर्व बेडकांनी ढकलीत ढकलीत त्या ओंडक्याला डबक्याच्या बाहेर फेकून दिले.

मंदबुद्धि म्हणाला, "आपण देवाची पुन्हा प्रार्थना करू."

मग सर्वांनी टुण्दिशी काठावर उड्या मारल्या, पुढचे लहान हात जोडले आणि प्रार्थना केली, "देवा आम्हाला पराक्रमी राजा पाहिजे."

ती ऐकल्यावर देवाने एक राजा पाठवून दिला. तो आकाशातून खाली उतरला. धुरकट रंग, हिरवे पाय, पिवळी व टोकाला काळी व जळकी अशी चोच, खालचे पांढरे पंख व सापासारखे पिवळे डोळे असे त्याचे विचित्र रूप पाहून बेडूक घाबरले. तो एक पाणबगळा होता. तो पाण्याच्या काठाशी एक पाय पोटाशी धरून डोळे मिटून स्वस्थ उभा राहिला. बेडकांना वाटले, हा तपस्वी देवाचे स्मरण करीत आहे. म्हणून ते त्याच्या जवळ गेले. त्याबरो-बर पट्दिशी त्याने एक एक बेडूक मटकावण्यास सुरुवात केली. ते पाहून मंदबुद्धि म्हणाला, "गड्यांनो, हा राजा सगळे बेडूक खाऊन टाकील. याला काही तरी उपायाने मारून टाकले पाहिजे."

त्याच डबक्यात एक 'वाकड्या' नावाचा खेकडा राहत होता. मंदबुद्धि म्हणाला, "मित्रा वाकड्या, तू या पाणबगळ्याला मार. आम्ही तुला भरपूर किडे खाण्यास देऊ."

मित्रांना सोडवण्याकरिता वाकड्या तिरपा तिरपा चालत बगळ्याच्या मागे गेला. बगळा डोळे मिटून पायावर उभा होता. वाकड्यानें मागून त्याच्या पाठीवर उडी मारली.



आपल्या करवतीसारख्या दोन नांग्यांनी त्याची मान पकडली व दाबून टाकली. बगळा मरून पडला. बेडूक म्हणाले "देवा, आता आम्हाला राजा नको. आम्ही अध्यक्ष निवडून त्याच्या तंत्राने आमचे राज्य चालवू."

मग सभा झाली आणि सर्वांनी मंदबुद्धीला अध्यक्ष नेमले. अध्यक्ष झाल्यावर त्या बेडकाला वाटले, आपल्यासारखा पराक्रमी जगात कोणी नाही. आपली आज्ञा आता सर्व

बेडूक ऐकतील. याप्रमाणे तो मंदबुद्धि अध्यक्ष मनोराज्यात दंग होऊन गेला. इतक्यात त्या ठिकाणी एक लहानसा बेडूक आला. त्या बेडकाने डबक्याच्या बाहेर एक मस्त बल पाहिला व त्याच्या पायाखाली आपण चिरडून जाऊ नये म्हणून तो उड्या मारीत डबक्यात आला. मंदबुद्धि म्हणाला, " काय रे, इतका का घाबरलास ? " तो लहान बेडूक म्हणाला, ' अध्यक्षमहाराज, मी आता एक मोठा प्राणी पाहिला. ' मंदबुद्धीने आपले अंग फुगविले व विचारले, ' तो एवढा मोठा होता काय ? ' लहान बेडूक म्हणाला, ' छे ! तो प्राणी यापेक्षा कितीतरी मोठा होता. ' मंदबुद्धी अंग आणखी फुगविले व फुटबॉलप्रमाण दिसू लागला. तरी लहान बेडूक म्हणाला, ' छे ! तो प्राणी यापेक्षा मोठा होता. ' मग मंदबुद्धीने आपले अंग आणखी फुगविले. पण असे करीत असता त्याचे पोट फट्दिशी फुटले व तो गर्विष्ठ मंदबुद्धि मरण पावला. मग सर्व बेडकांनी ठरविले की, आपल्याला राजा नको व अध्यक्ष नको. देवाने दिलेल्या स्थितीत आपण सुखाने राहू.

• • •

११

## डोमकावळ्याचें सौंदर्य

" मी भुकेने व्याकुळ झालो आहे. तीन दिवसाचा उपाशी आहे. आता हे पोट कसे भरावे ? या पलीकडच्या तळयात मासे पाण्यावर खेळत आहेत. पण ते मला कसे पकडता

येतील ? आता काही तरी युक्ति करून एखादा तरी मासा मटकावला पाहिजे."

याप्रमाणे विचार करीत उष्ण प्रदेशात राहणारा एक कोल्हा तळ्याच्या काठाने चालला होता. त्याचे चिंचोळे तोंड, कावरीबावरी मुद्रा, वाटोळे लहान असे डोळे, झुपकेदार शेपूट, तांबूस व पिवळा रंग यामुळे त्याच्या धूर्तपणात भर पडली होती. त्याचे पोट खपाटीला गेले होते. प्राण कासावीस झाल्यामुळे 'हुकई' 'हुकई' असा आवाज करीत तो ओरडू लागला. इतक्यात त्याला एक काळाकुळकुळीत असा डोमकावळा दिसला. त्याच्या बळकट पायांना चार बोटे होती. तो टुण्टुण् उड्या मारीत तळ्याजवळ आला. त्याने आपली तीक्ष्ण व बळकट चोच उघडली आणि पाण्यावर वल्ही फिरवून बागडणाऱ्या कल्लेदार माशापैकी एक मासा पटकन् पकडला व आपल्या लांब, टोकदार व बळकट पंखांनी त्याने भरारी मारली व एक वडाचे झाड गाठले. त्या झाडाच्या एका फताड्या व वाकड्यातिकड्या वाढलेल्या उंच फांदीवर तो जाऊन बसला. इतक्या वेळात त्याच्या चोचीतील तरण्या माशाने आपल्या प्राणाची आशा सोडून दिली होती.

हे सर्व दृश्य पाहात असलेला कोल्हा, तो ताजा मासा आपल्याला भोजनास मिळेल आणि आपला तीन दिवसांचा उपास सुटेल अशी आशा करीत होता. इतक्यात त्याला एक युक्ति सुचली. त्यानें गोड आवाजात डोमकावळ्यास हाक मारली, "मित्रा डोमकावळ्या ........" पण डोमकावळ्याने उत्तर, दिले नाही. कारण त्याच्या चोचीत कल्लेदार, ताजा व पुष्ट असा मासा होता.

धूर्त कोल्होबा सावधानपणाने पुन्हा बोलू लागला, "मित्रा डोमकावळ्या, तुझे पंख किती रेखीव आहेत! तुझे डोळे



हिऱ्यासारखे चमकतात! तुझ्या मानेचा आकार किती दिमाखदार आहे! तुझी छाती गरुडाप्रमाणें भरदार आहे. तुझी नखे सिंहाच्या नखाशी स्पर्धा करतील! या सर्वांवरून तुझा आवाजहि कोकिळेपेक्षा गोड असला पाहिजे अशी मला खात्री वाटते. हे प्रिय मित्रा, तुझ्या सुरेल गायनानें तू माझे कान तृप्त करशील का? तुझे मधुर गायन ऐकण्याकरिता मी अगदी अधीर झालो आहे."

या स्तुतीच्या मोहक शब्दांनी तो मठ्ठ डोमकावळा आपले भान विसरला. त्याला वाटले की आपण खरोखरच सुंदर आहोत. तो मनात म्हणाला, "माझ्यासारखा सुंदर

पक्षी जगात मिळणार नाही अशी या कोल्ह्याची खात्री झाली आहे. माझा आवाजहि कोकिळेपेक्षा गोड आहे हे मला सिद्ध केले पाहिजे. माझ्या सुस्वर कंठातून मधुर आलाप निघू लागल्यावर माझा प्रिय मित्र कोल्होबा आनंदाने डोलू लागले, तहानभूक विसरेल. ”

याप्रमाणे मनात विचार करून तो मंद डोमकावळा आपली चोंच वासून भसाड्या आवाजात ‘ काव, काव ’ असे कर्कश गाणे गाऊ लागला. त्याची ती चोच उघडताच तो तजेलदार रुचकर मासा टपकन् खाली पडला.

कोल्हयाने तो चटकन् आपल्या चिचोळ्या तोंडात धरला आणि मचक् मचक् असा आवाज करीत मटकावून टाकला. त्या चविष्ट माशाचा चट्टामट्टा केल्यार जिभल्या चाटीत तो धूर्त कोल्हा डोमकावळ्याला म्हणाला, “ हे मूर्खशिरोमणि डोमकावळ्या, मी तुझ्या बाहयांगाची तोंड फाटेपर्यंत खोटी स्तुति केली; पण तुझ्या डोक्यामध्ये मेंदूचे प्रमाण फार कमी आहे हे मी तुला सांगितले नाही. यापुढे लक्षांत ठेव की सर्व लोक आपला स्पार्थ साधण्याकरितां दुसऱ्याची स्तुति करतात जे या खोट्या स्तुतीने हुरळून जातात त्यांना तुझ्यासारखे दुःख भोगावे लागते. ”

• • •

# १२

# सिंहकन्येचे लग्न

जंगलात किर्रर्र रात्र झाली होती. अशा वेळी एका ओढ्याजवळ दोन तेजस्वी डोळे चकाकत होते. अंगाचा उग्र वास दरवळत होता. इतक्यात वीज चमकली आणि पाणी पिण्यास येत असलेला रेडा, जिराफ, हरीण इत्यादि प्राण्यांनी ओळखले की हा 'वनराज' आहे. त्याला चाळिसावे वर्ष लागले होते. राणी व राजकन्या गुहेत स्वस्थ निजल्या होत्या आणि वनराज भक्ष्याकरिता टपून बसला होता. त्याचा चेहरा वाटोळा असून कपाळ रुंद व सपाट होते. गोंडेदार शेपटी आपल्या मळकट अशा पिंवळ्या शरीरावर तो आपटीत होता. बारीक कमर आणि घेरेदार आयाळ यामुळे वय झाले असूनहि तो भव्य दिसत होता.

अशा त्या जंगलसम्राटाला पाहून ते वनपशू सैरावैरा दाही दिशांना पळू लागले. इतक्यात वनराजाने झेप टाकली व एका रानरेड्याची मान पकडली. मानेला हिसका देऊन त्याला आपल्या पाठीवर घेतले आणि आपल्या राजवाड्यात म्हणजे गुहेत नेले. वनराज, त्याची पत्नी व कन्या या तिघांनी पराक्रमाने मिळविलेल्या भक्ष्यावर ताव मारला. भोजन संपले. ते जिभल्या चाटू लागले. पोट भरल्यावर वनराजाने गंभीर गर्जना केली. त्या गर्जनेचे प्रतिध्वनि दऱ्याखोऱ्यातून उमटू लागले. काही वेळाने त्या तिघांच्या डोळ्यांवर सुस्ती आली. ते घोरू लागले.

त्या सिंहाच्या गुहेमध्यें कोपऱ्यात एक बीळ होते. त्यातून बाहेर जाण्याचा मार्ग होता. त्यात एक उदी रंगाचा मूषकांचा राजा रहात असे. त्याचे नाव अल्पबुद्धि. त्याचे निमुळते तोंड, द्रोणासारखे कान, शरीराबाहेर आलेले मोठे बटबटीत डोळे, लांब मिशा, खवलेदार बिनकेसाची शेपटी, वाटोळे गोटीदार शरीर ह्या सामग्रीमुळे तो चमत्कारिक दिसत होता. त्या अल्पवुद्धीच्या डोक्यात मेंदूहि फारच लहान होता. त्याचे पुढचे दांत वाढता वाढता टाळूत शिरू लागले होते. म्हणून तो सारखा दगड व लाकडे कुरतडीत होता. सिंहाने टाकून दिलेला एक मांसाचा तुकडा त्याने गट्ट केला. इतक्यात त्याचे लक्ष सिंहाच्या निद्रिस्त कन्येकडे गेले. तो मनात म्हणाला, "माझे लग्न अजून व्हावयाचे आहे. सिंहाची मुलगी मला राणी म्हणून मिळेल तर मी जगातील सर्व उंदरांचा राजा होईन." याप्रमाणें मनोराज्यात दंग होऊन तो नाचू लागला, पुढे सरकला आणि सिंहाच्या आयाळातून मार्ग काढू लागला. सिंहाला काही तरी टोचल्यासारखे वाटलें, आणि तो दचकून जागा झाला. फट्दिशी पंजा उलटून त्याने आयाळ खाजविले तो उंदीर त्याच्या हातात सापडला. झोपमोड झाल्यामुळे सिंह रागावला आणि पंजा मिटून त्याला चिरडू लागला. इतक्यात तो मूषकांचा राजा अल्पबुद्धि केविलवाण्या आवाजात प्रार्थना करू लागला, "हे वनराज, आपण थोर आहात. अनेक हत्तीचे कळप आपण उधळून लावले आहेत. माझ्यासारख्या क्षुद्र प्राण्याला मारून आपल्याला काय मिळणार? आपण मला जीवदान द्या. आपल्या उपकाराची फेड करण्याचा मी प्रयत्न करीन. सूर्याचे ऊन छत्रीमुळे लागत नाही. माहीत आहे ना आपणास?"

ती प्रार्थना ऐकून सिंह हसूं लागला. ‘ हा क्षुद्र प्राणी माझे उपकार कसे फेडणार ? ’ असा विचार त्याच्या मनात आला. पण त्याच्या प्रार्थनेमुळे सिंहाचे उदार अंतःकरण विरघळलें होते. म्हणून त्यानें आपला काळरूपी पंजा उघडा केला. अल्पबुद्धीने टुण्‌दिशी उडी मारली आणि धापा टाकीत आपल्या बिळात प्रवेश केला. तेथून तो गुहेच्या बाहेर आला. तेथून पांचशें हातांवर त्या मूषकराजाचा एका प्रचंड पिंपळाच्या बुंध्याशी एक राजवाडा होता. त्या राजवाड्याला पळून जाण्याकरितां पांच ठिकाणीं चोरदरवाजे होते. त्यांतून एका दरवाजानें तो भित्रा उदी रंगाचा मूषकराज प्रवेश करिता झाला; आणि त्याने असे ठरविलें की, चार महिने आपल्या बिळांतून बाहेर पडावयाचे नाही.

त्या सिंहाच्या आणि मूषकाच्या अरण्यापासून जवळ एक शहर होते. त्या शहरांत एक प्रसिद्ध सर्कस आली होती. त्यात एक सिंह शेळीबरोबर अहिंसात्मक भोजन करीत असे. तो खेळ पाहण्यास प्रेक्षकांच्या झुंडी लोटत. एक दिवस खेळ चालू असताना सिंहामधील रानटीपणा जागा झाला आणि त्याने पंजाच्या एका फटकाऱ्याने शेळीचा खून केला. पिंजऱ्यात मालक उभा होता. त्याने पिंजऱ्यात असलेल्या त्या सिंहाला गोळी घातली आणि ठार केले.

सिंहाचा खेळ संपल्यामुळे ती सर्कस बघण्यास लोक येईनात तेव्हां मालक आपल्या सहकाऱ्यांना म्हणाला, “ आपण जाळी घेऊन पलीकडे असलेल्या रानात जाऊ आणि एखादा सिंह पकडण्याचा प्रयत्न करू. मात्र उंदराचे पिंजरेहि बरोबर घ्या. कारण हे मूर्ख उंदीर निरुद्योगामुळे आणि वाढणाऱ्या दातांमुळे आपली जाळी कुरतडून टाकतात.”

याप्रमाणे ठरवून मालक व त्याचे सहकारी अरण्यात गेले. सात आठ ठिकाणी त्यांनी मोठाले खड्डे खणले व आपली जाळी लावली. त्यापैकी एक जाळे त्या पिंपळाच्या झाडापासून सुमारे पांचशे हातावर लावले होते. जाळे बांधलेल्या प्रत्येक खड्ड्याजवळ एक एक बोकड बांधून ठेवला होता. याप्रमाणे व्यवस्था करून ते शहरात गेले. बाहेर चाललेली ही गडबड ऐकून तो मूषकांचा राजा जास्तच घाबरला आणि आपल्या पांच चोरदरवाजे असलेल्या राजवाड्यात म्हणजे बिळात तोंड खूपसून बसला. आपली खवलेदार बिनकेसांची शेपूट त्याने आपल्याभोवती गुंडाळून घेतली.

रात्र झाली आणि चाळीस वर्षांचा वृद्ध वनराज शिकार करण्याकरिता बाहेर पडला. पिंपळाच्या वृक्षापासून तो पुढे गेला. माजलेल्या बोकडाच्या शरीराचा उग्र वास तीक्ष्ण नाकाला जाणवू लागला. तो दबकत दबकत पुढे गेला. आणि बोकडाच्या रोखाने त्याने गुरगुरत उडी टाकली. तो एकदम त्या खड्ड्यांत पडला. त्याचे पाय जायबंदी झाले. ते जाळे त्याच्या शरीराभोवती आवळून बसले. त्याची मान त्या जाळ्याच्या एका फासात सापडली. त्याला श्वास घेता येईना. बरगड्या दुखू लागल्या. शेपूट सुद्धा हालविता येईना. तो मोठमोठ्याने किंकाळ्या मारू लागला.

त्या किंकाळ्या पिंपळाच्या बुंध्याशी असलेल्या मूषकराजाने ऐकल्या. तो म्हणाला, "अरे, हा तर वनराजाचा आवाज—माझ्या उपकारकर्त्याचा केविलवाणा आवाज—या जंगलातील उदार राजाचा आवाज. ज्या राजकन्येशी

माझी लग्न करण्याची इच्छा आहे तिच्या पित्याचा आवाज.



माझी छाती भीतीने धडधडत आहे तरी सुद्धा मला धावत गेलेच पाहिजे. त्याने गणपतीचे स्मरण केले आणि टुण् टुण् उड्या मारीत खड्ड्यापर्यंत मजल गाठली. सिंह अखेरची धडपड करीत होता. मूषक म्हणाला, "अधिराज, जरा स्वस्थ बसा." असे बोलून मूषकाने आपल्या अणकुचीदार दातांनी जाळ्यांच्या दोऱ्या कुरतडण्यास प्रारंभ केला. 'कुरु' 'कुरु' 'कुरु' 'कुरु' असे त्याचे दांत आवाज करीत होते. गळ्याजवळील दोरी तुटली. दोन्ही पाय मोकळे झाले. हळूहळू सर्व जाळ्याचे बारीक बारीक तुकडे झाले. तो उंदरांचा राजा घामाघूम झाला. सिंहाला त्याचे स्वातंत्र्य मिळाले. सिंहाने मोकळा झाल्यावर खड्ड्याबाहेर उडी मारली व एक घनगंभीर गर्जना केली. त्याची राणी व

राजकन्या त्याला भेटण्यास धावत आल्या. त्यांच्या डोळ्यात आनंदाश्रु दिसत होते. सिंहिणीने एक हरीण मारून आणले. त्याचे चार भाग केले. पहिला भाग कृतज्ञतेनें मूषकराजाला दिला. दुसरा भाग वनराजाचा, तिसरा सिंहिणीचा आणि चौथा सिंहिणीच्या मुलीचा. याप्रमाणे वाटणी झाल्यावर त्यांनी भोजन केले. मूषकराजानें थोडेसे मांस खाल्ले व बाकीचे टाकून दिले.

नंतर प्रसन्न झालेला वनराज म्हणाला, "मूषकराज, मी संतुष्ट झालो. अगदी लहान प्राणी सुद्धा मोठ्यांचे प्राण वाचवू शकतात. या अरण्याचा मी राजा आहे. यातील कोणतीहि वस्तु मागा, मी देण्यास तयार आहे."

उंदीर चार फूट उंचीच्या एका दगडावर उभा राहिला आणि आपली खवलेदार शेपटी हालवीत म्हणाला. "वनराज, नीट विचार करा. शब्द परत घ्याल !"

"नाही, मी बदलणार नाही. सगळे राज्य मागितलेस तरी देईन."

"वनराज, नीट ऐका. तुम्ही वर देण्यास तयार आहा तर मी माझी जी इच्छा आहे ती सांगतो. तुमच्या उपवर मुलीचे माझ्याबरोबर लग्न लावून द्या मी सुद्धा उंदराचा राजा आहे."

हे म्हणणें ऐकून वनराजाला वाईट वाटले. तो म्हणाला, "मूषकराज, वर मागायला सुद्धा अक्कल लागते. मी वचन दिले आहे. अनेक जंगलातील सिंहांच्या छाव्यांनी माझ्या मुलीला मागण्या घातल्या आहेत; पण शब्द दिला-म्हणून माझी मुलगी मी तुला आर्पण करीत आहे."

उंदीर म्हणाला, "राजकन्ये, माझ्या घरी चल." उंद-

राच्या मागोमाग ती डौलानें पावले टाकीत चालू लागली. मध्यें अनेक पशु आणि पक्षी त्यांना भेटले व राजकन्येला भिऊन पळून गेले. उंदराला वाटले, हे सर्व आपल्याला भिऊनच पळत आहेत. पिपळाचे झाड दिसू लागले. मूषकराज "राजकन्ये माझ्या मागोमाग या बिळांत ये."

उंदीर आंत शिरला. सिंहाच्या मुलीने आपला एक पंजा त्या बिळात घातला. तो चुकून त्या मूषकाच्या अंगावर पडला. एक चीत्कार ऐकू आला आणि मूषकाचा मृत देह तिच्या पंजात सांपडला.

अल्पबुद्धि मूषकराजाचे मनोराज्य याप्रमाणे विलयाला गेले.

• • •

१३

# हत्तीची शिकार

एका जंगलामध्ये एका वडाच्या झाडाखाली एक कोल्ही रहात असे. तिला एका वेळी सहा मुले झाली. त्या मुलांचा तिला फार अभिमान वाटे. त्या वडापासून जवळच असलेल्या एका दरीमध्यें एक सिंहीण अर्धवट निद्रिस्त होती. जवळच तिचा एकुलता एक छावा डौलदार बैठक घालून बसला होता. त्या छाव्याकडें ती अर्धवट किलकिल्या डोळ्यांनी पाहात होती. वडाखाली राहणाऱ्या कोल्हीला वाटले की आपण सिंहिणीची फजिती करावी. म्हणून ती आपल्या मुलांचे लटांबर घेऊन त्या दरीजवळ गेली. तिनें

सिंहिणीला हाक मारली. सिंहिणीने तिचे स्वागत केले, आणि तिला व तिच्या सहा मुलांना पाहुणचार म्हणून थोडे हरिणाचे मांस दिले. नंतर त्यांच्या इकडच्या तिकडच्या गप्पा सुरू झाल्या. तेव्हा कोल्हीण म्हणाली, " मला एका वेळी सहा मुले होतात; पण काहींना एकच मूल होते. " तें ऐकून सिंहिणीने ओळखले की हा आपल्याला टोला आहे. मग ती सिंहीण म्हणाली, " तुझ्या मुलांना ' हुकई ' असा आवाज करून ' काकडीला राजे असलेले कोल्हे ' असे म्हणतात; आणि माझ्या एकाच बच्चाला मदोन्मत्त हत्तीच्या गंडस्थळावर उडी मारणारा ' सिंहाचा छावा ' असे म्हणतात. "

नंतर त्या सिंहिणीने त्या सर्व मुलांना काही प्रश्न विचारले. सर्वांत धाकट्याला तिने शेवटी प्रश्न विचारला.

" काय रे, तुझे नाव काय ? "

" माझे नाव तैलमती. "

" आमच्या या दरीत राहातोस का ? "

" राहीन व हरणाचे मास खाईन. "

" काय काय काम करशील ? "

" तुमच्या बच्च्याबरोबर खेळेन व त्याचे रक्षण करीन. "

हे तैलमतीचे उत्तर ऐकून सिंहिणीला कौतुक वाटले. व ती कोल्हिणीला म्हणाली " तू हे पोर माझ्याजवळ ठेव. याचा पिवळट करडा रंग, चिंचोळे तोंड आणि लांब व झुपकेदार शेपूट हे पाहून मला गंमत वाटते. मी याचे माझ्या बच्च्याबरोबर रक्षण करीन. "

कोल्हिणीने ते कबूल केले. तिला वाटले, बरे झाले. आपल्या तैलमतीला रोज मास खायला मिळेल.

तैलमती सिंहिणीच्या छाव्याबरोबर वाढू लागला. तो लाडावलेल्या पोराप्रमाणे वागत असे आणि सिंहकुमाराला बेताने वागण्याचा उपदेश करीत असे. याप्रमाणे एक वर्ष गेले.

एके दिवशी सिंहिणीला दरीत झोप लागली आणि ही पोरे खेळत खेळत दुसऱ्या जंगलात गेली. समोरून एक प्रचंड प्राणी येत होता. त्याचे कपाळ व डोके मोठे होते. रंग कळकट व काळा होता. डोळे फारच बारीक, कान सुपासारखे आणि नाक तीन फूट लांब. त्याच्या जाभाडातून दोन दात सुळ्यासारखे बाहेर आले होते. त्याचे शेपूट लहान होते. त्याचे खांबासारखे वाटोळे पाय आणि चौदा फूट लांबी पाहून कोल्होबा घाबरले. त्यांनी आपले शेपूट दोन पायात घातले आणि सिंहाच्या बच्च्याकडे पाहिले. तो बच्चा गुरगुरत त्या प्रचंड धुडावर--त्या हत्तीवर--उडी मारण्याच्या बेतात होता. तोच तैलमती म्हणाला. " बच्चा, हे साहस करू नको. मागे फीर. मी तुझा थोरला भाऊ आहे." हे पराभवाचे भाषण ऐकून तो बच्चा शेपटी आपटीत आपटीत नाइलाजाने मागे परतला. ते दोघे दरीत आले. मग बच्चा सिंहिणीला म्हणाला, 'आई, मी आज हत्तीची शिकार करणार होतो; पण या दादिटल्याने मागे परतविले. मी कालचे शिळे मास खाणार नाही. मी आज उपवास करीन.' असे बोलून तो बच्चा झोपी गेला. मग सिंहीण हळूच तैलमतीजवळ गेली व त्याला म्हणाली, " बाळ, माझा मुलगा सिंह आहे.

" तू माझा मुलगा नाहीस. मी तुला मुलाप्रमाणे वाढविले.

आज बच्चाने तुझे ऐकले; पण नेहमीच तो ऐकणार नाही. एखादे दिवशी हत्ती आणि कोल्हा या दोघांची शिकार करील. म्हणून तू येथून पळ काढ आता. ''

हे भाषण ऐकून तो तैलमती धावत सुटला. त्याने एकदा-सुद्धा मागे पाहिले नाही. चार पाच मैल दूर गेल्यावर तो मनात म्हणाला, ' मी सुद्धा हत्तीची शिकार करून दाखवितो. ' मग तो रात्रभर विचार करीत राहिला. त्याने मनात काही युक्ति ठरविली. पहाट झाली मग तो दबत दबत पूर्वी ज्या ठिकाणी हत्ती दिसला होता तेथे गेला. हत्ती थोडासा झोपेच्या गुंगीत होता.

" नमस्कार राजाधिराज. " तैलमति म्हणाला.

"मी राजा नाही. सिंह रानाचा राजा आहे. "

" खरे आहे; पण तो सिंह काल मरण पावला. "

" मग त्याचा मुलगा बच्चा राजा होईल. "

" तो कसला राजा होतो आहे ? काल तो तुम्हाला भिऊन पळाला म्हणून रानातील सर्व पशूंनी तुम्हालाच राज्याभिषेक करण्याचे एकमताने ठरविले आहे. "

" शाबास कोल्होबा. मी तुला पंतप्रधान करीन; कारण तू ही आनंदाची बातमी आणलीस. "

"पण राजेसाहेब, राज्याभिषेक करण्याचा मुहूर्त जवळ आला आहे. सर्व पशू आपली वाट पाहात आहेत. तरी पलीकडल्या रस्त्याने चला. " कोल्हा म्हणाला.

हे ऐकताच तो हुरळून गेलेला बारिक डोळ्यांचा हत्ती आपले सुपासारखे कान हलवीत त्या तैलमतीच्या मागून जाऊ लागला. दलदलीच्या रेताड प्रदेशातून बेताने पावले टाकीत पुढे गेला. राज्यपद मिळण्याच्या कल्पनेने अंध

झालेला तो हत्ती पुढे आला. आणि त्या चिखलाच्या राड्यात मानेपर्यंत रुतला.



" पंतप्रधान तैलमती, मला वर काढ."

" राजेसाहेब, " कोल्हा म्हणाला, " राज्यपद मिळण्याची वेळ टळून गेली, आता चिखलात रुतून बसा. यमराज तुम्हाला सोडवील. " कोल्हा म्हणाला.

पुढे चिखलात गुदमरून काही तासांनीं तो हत्ती मरण पावला.



## १४

# विहिरीतला वनराज

तैलमती नावाचा एक कोल्हा होता. त्याने आपल्या चातुर्याने हत्तीची शिकार केली होती; पण तेवढ्याने त्याचे समाधान झाले नाही. त्याच्या मनात आले की एखाद्या सिंहाची शिकार केली पाहिजे. याकरिता तो लपत छपत निघाला. काही राने टाकल्यावर तो एका गर्द अरण्यात आला. त्याला रस्त्यात एक अस्वल भेटले आणि पलीकडच्या झाडावर एक माकड दिसले. अस्वल म्हणाले, "कोल्होबा, इथे कशाला आलात? या रानातला सिंह फार खादाड आहे. त्याला एका न्याहारीला एक कोल्हा, एक अस्वल आणि एक माकड असे तीन प्राणी लागतात." माकडानेहि तेच सांगितले. तेव्हा कोल्हा म्हणाला. "अस्वलमामा आणि माकडकाका, आपल्याला केव्हा तरी तो खाणारच ना? मग आपणच जगण्याची काही तरी युक्ति करू." तो असे बोलतो आहे इतक्यात सिंहाची गर्जना ऐकू आली. माकड धप्‌दिशी झाडावरून पडले. अस्वलाला मूर्च्छा आली. तैलमती धीर धरून उभा राहिला. सिंह पुढे आला तेव्हा कोल्हा म्हणाला, "जंगलाचे महाराज, मी आपल्याला मुजरा करतो." त्याने अस्वलाला व माकडाला खुणावले. त्यांनीहि मुजरा केला. सिंह म्हणाला,

"काय रे तुमचे माझ्याकडे काय काम आहे?"

“ आम्ही तिघे आपली सेवा करण्यास आलो आहोत. ” कोल्हयाने उत्तर दिले.

“ तुम्ही माझी काय सेवा करणार ? ”

“ आम्ही जनावरांना आपल्या राजवाड्याजवळ आणू. नंतर आपण त्यांना ठार मारावे. ”

“ मग चला तर माझ्याबरोबर. मी तुम्हाला माझी गुहा दाखवतो. ” सिंह म्हणाला.

घाबरत घाबरत ते तिघे सिंहाच्या मागे चालू लागले. तासाभराने ते डोंगराच्या टोकावर सिंहाच्या गुहेजवळ गेले. तेथे अनेक पशूंची हाडे पडली होती. मासाची दुर्गंधी येत होती. ती दुर्गंधी सहन न होऊन अस्वलाने आपल्या नाका-वर हात ठेवला. ते पाहून सिंह संतापला व त्याने अस्वलाचे



नाक तोडून टाकले व नंतर त्याला ठार मारले. नंतर तो

सिंह माकडाकडे पाहू लागला. माकड गडबडले व म्हणाले, " महाराज, आहाहा ! आपल्या स्वयंपाकघरातून काय सुगंध दरवळत आहे ! " हे त्याचे खोटेपणाचे भाषण ऐकून सिंह चिडला व त्याने माकडाची तंगडी धरली व त्याचे डोके एका झाडाच्या खोडावर ताडकन् आपटले. पुढे तैलमतीची पाळी आली. " काय रे कोल्ह्या, तुला या स्वयंपाकघरातून कसला वास येतो आहे ? सुगंध येतो की दुर्गंध येतो ?" सिंहाने गुरगुरत विचारले.

" सरकार, मला सांगता येत नाही. क्षमा करा. "

" का सांगता येत नाही ? "

" सरकार, मला पडसे फार झाले आहे; त्यामुळे माझ्या नाकाला कोणताच वास येत नाही. अस्वल, माकड यांच्या मासावर आपली न्याहारी संपली म्हणजे मग मी उत्तर देईन."

" मी तुझ्या उत्तराने खूष झालो आहे. आजपासून मी तुला प्रधान केले आहे."

" सरकार आपले माझ्यावर उपकार आहेत. आपली न्याहारीची वेळ सोडून दुसऱ्या कोणत्याहि वेळेला मीं आपले काम करीन."

" बरे; काय रे, माझा हा शिकार करण्याचा त्रास कमी होईल का ? "

" होईल "

" कसा होईल ? "

" सरकारनी अशी दवंडी पिटावी की, 'माझ्याकडे रोज एक पशु न्याहारीला पाठवावा. मी आहार थोडा कमी केला आहे.' अशी दवंडी आपण पिटलीत म्हणजे रानातील सर्व पशु शांत होतील. येथेच राहतील. त्यांच्यातील एक

पशू मी रोज आपल्याकडे आणीत जाईन. आज हरीण तर उद्या ससा, परवा बैल तर कधी डुक्कर असे निरनिराळ्या प्रकारचे पुष्ट आणि चविष्ट मासाचे प्राणी मी आपल्याकडे आणीत जाईन." कोल्हा म्हणाला.

सिंहाने त्याचे म्हणणे मान्य केले. कोल्ह्याने त्याप्रमाणे दवंडी पिटली. सगळ्या पशूंना थोडासा आनंद झाला. कोल्हा सकाळी उठे व एका पशूला सिंहाच्या गुहेत घेऊन जाई. काही पशू त्याला म्हणत, "तैलमती प्रधानजी, राजाचे आयुष्य किती आहे हो? या त्रासातून आपल्या अरण्याची सुटका करा. तुमच्यासारखा बुद्धिमान या अरण्यात कोणी नाही. ह्या सिंहाच्या त्रासांतून तुम्ही आमची सुटका केलीत तर तुम्हाला रोज एक मेलेली कोंबडी बक्षिस देऊं."

कोल्हा म्हणाला, "खबरदार असे बोलाल तर! मी राजनिष्ठ सेवक आहे. पुन्हा असे बोलाल तर तुम्हाला राजद्रोही म्हणून तुरुंगात टाकीन."

कोल्ह्याचा रोज एक पशू नेण्याचा क्रम सहा महिने चालला. सिंहाचा कोल्ह्यावर पूर्ण विश्वास बसला. एक दिवस कोल्हा सकाळी उठला. सिंहाला त्याने मुजरा केला व तो सिंहाला म्हणाला, "आता एक पुष्ट असा काळवीट पाहून ठेवला आहे. त्याला मी घेऊन येतो. आपण तोंड धुऊन दात स्वच्छ करून ठेवा."

"जा, लवकर काळविटाला घेऊन ये. आज मला फार भूक लागली." सिंह म्हणाला.

कोल्हा गुहेच्या बाहेर गेला व दोन मैलावर एका मोठ्या विहिरीच्या जवळ एका वडाच्या ढोलीत लपून बसला. इकडे आठ वाजले, नऊ वाजले, दहा वाजले, तेव्हा सिंह गुरगुरून

आपली शेपटी आपटू लागला आणि मनात म्हणाला, " अजून त्या पुष्ट काळविटाला तो कोल्हा आणीत कां नाही! आज कोल्ह्यालाच फाडून खातो."

साडे अकरा वाजले कावेबाज कोल्हा कष्टी चेहऱ्याने हळहळू सिंहाच्या गुहेकडे येत होता. सर्व पशु आपला श्वास थांबवून तो काय करतो आहे हे दुरून पाहात होते. कोल्हा जवळ आला व त्याने अगदी लवून मुजरा केला.

" महाराज काय सांगू ? "

" बोल लवकर. नाही तर न्याहारीला तुलाच खाऊन टाकतो. पुष्कळ दिवसात कोल्ह्याचे मास मला मिळाले नाही. " सिंह म्हणाला,

" सिंहमहाराज, वाटेत एक विहिर आहे. तेथे एक सिंह राहण्यास आला आहे. मी काळविटाला घेऊन येत असता त्याने त्याच्यावर झडप घातली व त्याला खाऊन टाकले. "

" कुठे आहे तो सिंह ? "

" महाराज, तो दुष्ट सिंह त्या विहिरीत राहातो; आपण त्याला एका थपडीत मारू शकाल. "

" दाखव मला तो दुष्ट. "

" यावे महाराज ! "

कोल्ह्याने त्या भुकेलेल्या रागावलेल्या सिंहाला विहिरी पर्यंत नेले. सूर्य माथ्यावर आला होता. कोल्हा विहिरीच्या काठावर उभा राहिला व आत डोकावून म्हणाला, " महाराज, तो पहा तुमचा शत्रु तुमच्यासारखाच रागावलेला दिसतो. " सिंह काठावर आला. त्याने आत डोकावून पाहिले. विहिरीच्या पाण्यात त्याला दुसरा सिंह दिसला. त्याच्यासारखेच रुंद कपाळ, घारे डोळे, भव्य आयाळ आणि बारीक कंबर.

हे पाहून तो वनराज संतापला. हे आपले प्रतिबिंब आहे हे रागाच्या भरात त्याच्या लक्षात आले नाही. त्याने गर्जना केली अ ऽ ऽ ऽ ह म् म् अ ऽऽऽ ह म्. विहिरीतून त्या गर्जनेचा प्रतिध्वनि निर्माण झाला. त्यामुळे वनराज फारच चवताळला त्याने आपली शेपटी आपटली, आयाळ हालवले आणि विहिरीतल्या सिंहावर उडी टाकली. आत सिंह नव्हताच. ते त्याचे प्रतिबिंब होते. विहीर सहा पुरुष खोल होती. वर येण्यास मार्ग नव्हता. वरून तैलमतीने दगड टाकण्यास सुरुवात केली. काही वेळाने तो वनराज पाण्यात बुडून मरण पावला. तैलमतीने आपल्या चातुर्याने सिंहाची शिकार केली.

• • •

१५

## उंदीरमामा

एका रानात एक पिंपळाचे झाड होते. त्या झाडाखाली अनेक बिळे होती. त्या बिळात किती तरी उंदीर राहात असत: ते वाटेल तसा धिंगाणा करीत. नाचत, हसत, खिदळत व भोवतालच्या शेताची नासधूस करीत.

पण एकदा असे झाले की, पलीकडच्या अरण्यातून हळू हळू सरपटत एक अजगर तेथे आला. तो चाळीस फूट लांब होता. तो त्या पिंपळाच्या झाडाजवळ आला व त्याने आपला जबडा उघडला. एका बिळाला त्याने तोंड लावले

व श्वास आत ओढला. त्याबरोबर पंचवीस तीस उंदीर त्याच्या तोंडात ओढले गेले. ते त्याने गट्ट केले. नंतर पचन होण्याकरिता त्यानें पिंपळाच्या झाडाला विळखा घातला आणि सुस्त होऊन स्वस्थ झोप घेतली.

हे अरिष्ट आलेले पाहून सर्व उंदीर घाबरले. आता काय करावे ? कोणाची मदत घ्यावी? काही सुचेना.मग त्यांच्यात एक शहाणा उंदीर होता. त्याचे नाव मामा. तो म्हणाला. सर्वांनी अजगर झोपेत असताना पाय न वाजवता पलीकडे जवळच एक वडाचे झाड आहे तेथे जमावे. अजगर तेथे



आला तर पारंब्यावरून चढून वरती जावे." सर्वांनी त्याचे म्हणणे ऐकले व वडाखाली सभा भरवली. एक म्हातारा उंदीर म्हणाला, "मामांनी आजच्या सभेचे अध्यक्ष व्हावे असे मी सुचवतो." एक छोटा उंदीर म्हणाला, "या सूचनेला माझा दुजोरा आहे."

उंदीरमामा अध्यक्ष झाला. एका उंच दगडावर तो बसला. सर्व उंदीर भोवती वर्तुळात बसले. "उंदीरबंधूनो



आपला मालक जो गणपति त्याचे स्मरण करून मी आपल्या

भाषणाला सुरुवात करतो. प्रत्येक वक्त्याने पुढे येऊन या संकटातून सुटून जाण्याचा मार्ग सुचवावा."

एक म्हणाला "अजगराला रोज एक बळी द्यावा." दुसरा ओरडला "त्याला रोज पन्नास उंदीर लागतील." तिसरा म्हणाला "बिळातून बाहेरच पडू नये." चवथा म्हणाला "मग उपास करून मरावे लागेल." पांचवा म्हणाला "आपण त्याच्याशी लढाई करू." सहावा गरजला "मग आपणच आमचे सेनापति व्हा." सातवा म्हणाला "अजगराच्या गळयात घंटा बांधा म्हणजे तो आला की घंटा वाजू लागेल." आठवा ओरडला "आता मामांना बोलू द्या. आपण सर्व महामूर्ख आहोत. मामाच यातून काही मार्ग काढतील."

मग उंदीरमामा अध्यक्ष हे आपल्या शरीराभोवती शेपटीचे वेटोळे घालून बोलू लागले. "हे उंदीर बंधूनो आपण सर्व दुर्बल आहोत. तुम्ही सुचविलेले सर्व मार्ग चुकीचे आहेत असे माझ्या अल्प बुद्धीला वाटते. तुम्ही माझ्यावर रागावला तर नाही ना ?"

"नाही नाही. आम्हाला तुम्हीच मार्ग सुचवा." सर्व उंदीर ओरडले.

"ठीक आहे. तुमचा माझ्यावरचा विश्वास पाहून मला मूठभर मास आले आहे; पण ते मास मांजराला किंवा अजगराला देणार नाही. आपल्या एका पूर्वजाने मांजराच्या गळयांत घंटा बांधावी म्हणजे मांजर आल्याचे कळेल असे सुचविले होते; पण घंटा बांधण्यास कोणीच पुढे होईना, सभा चालू असतानाच मांजर आले व सर्व उंदीर घंटा टाकून बिळात लपले. तीच सूचना आज एका उपवक्त्याने केली; पण ती उपयोगी नाही."

" उंदीरमामा, आता वेळ लावू नका. नाही तर अजगर जागा होईल. तुमची युक्ति काय आहे ती सांगा." एक म्हातारा पांढऱ्या रंगाचा उंदीर म्हणाला, "ऐका ऐका" उंदीरमामा म्हणाले, " आपण प्रत्येकाने भोवताली प्रत्येक शेतावर ज्या झोपड्या आहेत त्या झोपड्यात जा. गाडगी-मडकी धुंडाळा आणि थोडी साखर आणा. जा, पळा." असे सांगताच एक उंदराची पलटण अजगराशी युद्ध करण्याकरता साखर आणण्यास निघाली. त्यानी झोप-ड्यात प्रवेश केला. गाडगी–मडकी पाहिली व त्यातून साखर आणली. एक गाडगे साखर जमा झाली. म्हातारा उंदीर म्हणाला, " उंदीरमामा, ही घ्या साखर. आता काय हुकूम बोला."

" आता समोर जे मुंग्याचे वारूळ दिसत आहे तिथे जा व मुंग्यांच्या राणीला माझा निरोप कळवा, की मी तिला भेटायला येत आहे." मामा म्हणाले.

नंतर मामा एका तरण्याबांड उंदराकडे वळले व त्याला म्हणाले, "त्या समोरच्या झोपडीत या गावचा श्रीमंत पाटील राहतो. त्याची बायको नेहमी आरशात पाहात असते. तेवढा आरसा पळवून आण."

तो तरणा उंदीर धावत गेला व मागल्या दाराने प्रवेश करून त्याने तो आरसा पळवून आणला.

नंतर उंदीरमामा उठले व वारुळाजवळ गेले. मुंग्याची राणी बाहेर आली; कारण तिला निरोप पोचला होता. " राणीसाहेब," मामा म्हणाले, "मी चार शेर साखरेचा नजराणा आपल्याला आणला आहे. याचा स्वीकार करा.

" मामा, तुम्ही फार मायाळू आहात." राणी खूष

होऊन म्हणाली. "पण जे तुम्ही चिमुटभर साखर सुद्धा आम्हाला उसनी देत नाही ते आज एक गाडगे साखर देता याचा अर्थ काय ? कामापुरते मामा असतात. उंदीरमामा, तुमचे काय काम आहे ते बोला."

उंदीरमामाने राणीच्या कानामध्ये आपले काम सांगितले. राणी हसली. मग तिने ती साखर वारुळातील हजारो मुंग्यांना वाटून दिली. मुंग्यांचे साखरेचे जेवण झाले. मग राणी म्हणाली, "चला पिंपळाच्या झाडाकडे चला. युद्ध झाल्यावर साखरेपेक्षा चांगले भोजन मिळेल." मुंग्यांच्या रांगा पिंपळाकडे चालू लागल्या.

इकडे सर्व उंदीर काळजीत होते; कारण उंदीरमामांची युक्ति कोणालाही समजली नव्हती. मामा राणीला निरोप पोचवून पिंपळाजवळ आले. त्यानी तो आरसा घेतला. त्याचे तुकडे केले व ते तुकडे बिळाभोवताली पेरून ठेवले आणि मामा आपल्या बिळांत झोप घेण्यास गेले व काही वेळाने घोरू लागले.

एक उंदीर म्हणाला, "आमची सर्वांची मरायची वेळ आली आहे आणि हे उंदीरमामा मिळालेली साखर भिकारी मुंग्याना वाटून येथे झोप घेत आहेत. हे कसले अध्यक्ष ? चला आपण दुसरा अध्यक्ष निवडू."

म्हातारा उंदीर म्हणाला, "गप्प बैस मूर्खा. मामांची करामत तर पहा !"

दुसऱ्या दिवशी सकाळी अजगर जागा झाला. त्याला पुनः भूक लागली. तो हळूहळू बिळाकडे निघाला. सर्व उंदीर श्वास कोंडून दबा धरून बसले होते. त्यांनी बिळावर मोठाले दगड ठेवले होते. इकडे राणीसहित मुंग्या पिंपळाकडेच येत

होत्या. त्या पिंपळाजवळ आल्या व त्यांनी त्या झाडाला वेढा दिला. अजगराला याची काहीच कल्पना नव्हती. तो बिळे तपासू लागला. सरपटताना ते काचेचे तुकडे त्याच्या मऊ अंगाला लागले. त्याला अनेक जखमा झाल्या. त्या जखमातून रक्त वाहू लागले. इतक्यात मुंग्यांचा वेढा पुढे आला. त्यानी त्या रक्ताळलेल्या भागावर हल्ला केला. हजारो मुंग्या अंगावर दिसू लागल्या. अजगर तडफडू लागला. हजारो मुंग्या त्याचे रक्त खाऊ लागल्या. सुमारे दोन तासांनी तो प्रचंड अजगर मरून पडला.

सर्व उंदीर बाहेर आले. नाचू लागले, बागडू लागले. उंदीरमामा बाहेर आला. त्याने मुंग्यांच्या राणीला आपल्या बिळांतील छटाक साखर देऊन टाकली. सर्व उंदीर सभोवती जमले व ओरडले, "राणी की जय! उंदीरमामा की जय!"

● ● ●



# आम्ही प्रकाशित केलेले ' साने गुरुजी ' यांचे वाङ्मय

| | |
|---|---|
| राष्ट्रीय हिंदूधर्म | २–५० |
| समाजधर्म | १–७५ |
| सुंदर कथा | ०–५० |
| मुलांसाठीं फुलें | ०–४० |
| क्रान्ति | ५–०० |
| क्रान्ति ( संक्षिप्त ) | २–०० |
| तीन मुले | ३–५० |
| ईश्वरचंद्र विद्यासागर | ३–०० |
| इतिहासाचार्य राजवाडे | २–०० |
| श्रीजीवन | ३–५० |